अनुक्रमणिका

पुणे येथे डिसेंबर १९८५ मध्ये अखिल भारतीय गुजराती साहित्य संमेलन भरले होते. या संमेलनाचे अध्यक्ष श्री. के. का. शास्त्री आणि इतर प्रमुख गुजराती साहित्यिकांचा महाराष्ट्र साहित्य परिषदेत सत्कार करण्यात आला.



साहित्य परिषदेचे अध्यक्ष श्री. शंकर पाटील श्री. के. का. शास्त्री यांचा पुष्पगुच्छ देऊन सत्कार करीत असताना. शेजारी साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष श्री. राजेन्द्र बनहट्टी.



श्री. के. का. शास्त्री सत्काराला उत्तर देत असताना.







महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २३६ □ जानेवारी–मार्च १९८६ □ मूल्य पाच रुपये

□

अनुक्रम



□

संपादक : वसंत स. जोशी
संपादन समिती : ज्योत्स्ना देवधर, राजा फडणीस, म. ना. अदवंत
सल्लागार : राजेन्द्र बनहट्टी, गो. म. कुलकर्णी
प्रकाशक व मुद्रक : म. वि. गोखले, कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०
दूरध्वनी : ४४ २९ ६३
मुद्रणस्थळ : सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार पेठ, पुणे ४११ ०३०
मुखपृष्ठ : अनिल अवचट

□

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत



## संपादकीय

**इये मराठीचिये नगरी**
**साहित्याचा सुकाळु करी...**

गेल्या तीन महिन्यात या मराठी मायभूमीत अनेक ठिकाणी छोटी-मोठी साहित्य संमेलने भरली. त्यात नांदेडच्या अखिल भारतीय संमेलनापासून आजरा-विटा येथील ग्रामीण साहित्य संमेलनांचा अंतर्भाव होता. साहित्यप्रेमी भगिनी मंडळांनीही त्यातील आपला वाटा उचलला. त्यात आनंदाची भर म्हणजे तेहतिसावे गुजराती साहित्य संमेलनही पुण्यातच भरले. असा हा साहित्योत्सवाचा ऋतुराज साऱ्या महाराष्ट्रभर बहरला होता. पुण्यात नोव्हेंबरच्या पहिल्या आठवड्यात सुप्रसिद्ध बालकथा / गीतकार आणि चरित्रकार श्री. राजाभाऊ मंगळवेढेकर यांच्या अध्यक्षतेखाली बालकुमार साहित्य संमेलन भरले होते. याच पुण्यात चाळीस वर्षांपूर्वी कै. साने गुरुजी यांच्या अध्यक्षतेखाली नाना वाड्यात कुमार साहित्य संमेलन भरले होते, त्याचे या निमित्ताने स्मरण झाले. त्यांचे चरित्रकार श्री. राजाभाऊ या संमेलनाचे अध्यक्ष असावेत, हाही एक चांगला योग म्हणावा लागेल. विदर्भ साहित्य संघाचे सदतिसावे अधिवेशन घाटंजी येथे भरले. सुप्रसिद्ध कवी आणि ललित लेखक श्री. मधुकर केचे हे अध्यक्ष होते. साहित्यातील कारागिरीच्या भावाविषयी आपले परखड विचार त्यांनी व्यक्त केले. ' गिऱ्हाइकांचा अंदाज घेऊन लिहिणाऱ्याला प्रसंगी एखाद्या गोष्टीला ' प्रथम ' म्हणून श्रेय मिळतं...अभंग...प्रवासवर्णनात मी असं श्रेय मिळविलं. वातावरण हे नाविन्याचं मुख्य गमक मानलं की मग त्या त्या काळी गाजलेल्या वाङ्मयप्रकारांचं सूत्र गवसतं. ' या सूत्राधारे त्यांनी प्रादेशिक, दलित आणि मर्ढेकरी साहित्याचा विचार मांडला. जयसिंगपूरच्या दक्षिण महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून श्री. पी. सावळाराम म्हणाले, ' काव्याच्या माध्यमापेक्षा गीतांच्या माध्यमातून सर्वसामान्य लोकांपर्यंत मला पोचता आलं. लोकांच्या प्रेमानं मी लिहिता झालो. पैशासाठी, प्रसिद्धी-साठी बाजारू शब्दांचा वापर मात्र कधीही केला नाही...त्यामुळे मी सात्त्विक आणि आनंदी जीवन जगत आहे. तेहतिसाव्या गुजराती साहित्य संमेलनाचे उद्‌घाटक होते ' साधना 'कार प्रा. वसंत बापट. आपल्या भाषणात आंतरभारतीच्या उद्दिष्टांचा उल्लेख त्यांनी केला, गुजराती-मराठी भाषा-भाषकांचा संबंध विशद केला. स्वतःच्या गुजरातशी आलेल्या संबंधांचा परिचय दिला आणि ' नजीकच्या भविष्यातच प्रादेशिक वैशिष्ट्यांवर आधारलेले ग्रामीण साहित्य कालबाह्य होण्याची चिन्हे दिसतात ( त्यामुळे ) आत्यंतिक व्यक्तिवादाची गतही अशीच होणार ' अशी भीती त्यांनी व्यक्त केली. औदुंबर येथील त्रेचाळीसाव्या साहित्यसंमेलनातील अध्यक्षीय भाषणात श्री. वामनराव चोरघडे यांनी इंग्लिश भाषेच्या वाढत्या आक्रमणाने मराठी साहित्याला मोठा धोका उत्पन्न झाल्याचा इशारा दिला. श्री. रणजित देसाई यांनी आजरा येथील ग्रामीण साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून बोलताना ग्रामीण, दलित, नागर हे साहित्याचे भेद अमान्य केले. ' समाजजीवनातून वाङ्मय फुलत असल्याने हे सर्व साहित्य सामाजिक समजलं पाहिजे ' असे सांगून दलित वाङ्मयातील अनुभवांची शिदोरी संपल्यानंतर त्यांचे साहित्य इथेच थांबणार नाही ना, अशी शंका व्यक्त केली. विटा येथील साहित्य सेवा मंडळाच्या अकराव्या ग्रामीण साहित्य संमेलनाचे अध्यक्ष श्री. शंकर पाटील होते. आपल्या भाषणात ' ज्यातून समाजाची सुखःदुखे व्यक्त होतात, ते कथा-कादंबऱ्या यांसारखे साहित्य बोलीभाषेतूनच असावे ' असा आग्रह त्यांनी धरला. साहित्य निर्मितीसाठी चिंतन, मनन व वैचारिक देवाणघेवाणीची आवश्यकताही त्यांनी प्रतिपादन केली, तर श्री. शंकरराव खरात यांनी सातारा येथील भाषणात शेकडो नवोदित लेखकांना प्रकटीकरणाची संधी नसल्याने त्यांचा कोंडमारा होत असल्या-बद्दल खंत व्यक्त केली. अकोला येथील तिसऱ्या मराठी लेखिका संमेलनाच्या अध्यक्षपदावरून बोलताना

सौ. शांताबाई किर्लोस्कर यांनी ' समाजातील निरक्षर लोकांपर्यंत पोचेल आणि अन्यायाला वाचा फुटेल असे साहित्य मराठी लेखकांनी निर्माण करावे ' असे आवाहन केले. आज लेखन उदंड होत असले, तरी जीवनदर्शन घडविण्याचा साहित्याचा विशेष लोप पावत असल्याबद्दल त्यांनी खेद व्यक्त केला.

या ग्रामपातळीपासून जिल्हा, प्रादेशिक पातळीपर्यंतच्या साहित्य संमेलनांना शेकडो रसिकांचा प्रतिसाद लाभला. प्रचलित विषयावरील परिसंवाद, कथाकथन, कविसंमेलन, अनुभव आणि आत्मकथन, कथेमागील कथा यांसारख्या कार्यक्रमांना अखंड उपस्थिती असे. प्रस्थापित साहित्यिकांचा या कार्यक्रमांतील सहभाग ही एक आशादायक घटना होय. त्या त्या परिसरातील साहित्यिक आणि शेकडो कवी यांना यानिमित्ताने व्यासपीठ उपलब्ध झाले. अखिल भारतीय साहित्य संमेलनात समाविष्ट होऊ शकणारे साहित्यिक अशा लहान-मोठ्या साहित्य संमेलनातून उदयास येतात, ही त्यांची मोठीच फलश्रुती म्हटली पाहिजे. सारी रात्र आणि पहाट जागून, एवढेच नव्हे तर पावसापाण्याची पर्वा न करता खेडोपाडीच्या संमेलनांना असणारी रसिकांची आणि साहित्यिकांची ही उपस्थिती मराठी साहित्याच्या उज्ज्वल भवितव्याची निशाणीच म्हणावी लागेल. याच संदर्भात जयसिंगपूर संमेलनाच्या उद्घाटनाच्या भाषणात प्रा. गं. बा. सरदार यांनी व्यक्त केलेले विचार संबंधितांनी लक्षात घेतले पाहिजेत. ते म्हणाले, ' विभागवार साहित्य संमेलनांनीच साहित्य चळवळ अधिक लोकाभिमुख बनते आहे. साहित्याचे लोण सर्व थरात पोहचविण्यास सुरवात झाली आहे. अशावेळी साहित्यिकांनी लोकांना साहित्याचा आस्वाद घेण्याची शिस्त लावली पाहिजे." अखिल भारतीय स्तरावरील साहित्य संमेलनास हजारोंनी उपस्थित राहणाऱ्या रसिकांना साहित्यिकांशी जी जवळीक साधता येत नाही, ती अशा संमेलनांनी साधली जाते. हे लक्षात घेऊन मान्यवर साहित्यिकांनी ( निदान ) रसिकांशी असणारी आपली बांधिलकी मान्य करून अशा संमेलनातून उपस्थित राहणे हे आपले कर्तव्य मानले पाहिजे. साहित्याचा जिव्हाळा आणि माणुसकीचा उमाळा त्यांना अशा संमेलनांतून अनुभवावयास मिळाल्याखेरीज राहणार नाही.

### नाटककार माधवराव जोशी जन्मशताब्दी

' स्थानिक स्वराज्य ' अथवा ' म्युनिसिपालिटी ' या नाटकामुळे ख्यातनाम झालेले कै. माधव नारायण जोशी यांची जन्मशताब्दी १९८५–८६ मध्ये झाली. नाटककार खाडिलकरांच्या प्रभावाखाली प्रारंभी दोन पौराणिक नाटके त्यांनी लिहिली, परंतु विनोदाच्या माध्यमाने सामाजिक दुर्गुणांवर उपरोधिक टीका करण्याचा उपक्रम त्यांनी सामाजिक नाटकांच्या द्वारा केला. रंजनाच्या माध्यमातून सामाजिक उद्बोधन करण्याचा त्यांचा प्रयत्न होता. त्यांचे ' गिरणीवाला ' हे कारखानदार आणि कामगार संबंधांवरील नाटक किंवा ' म्युनिसिपालिटी ' हे स्थानिक स्वराज्य संस्था विषयावरील नाटक याच विषयावरील वरेरकर आणि अत्रे यांच्या नाटकांचे स्मरण करून देतात. कै. माधवराव जोशी यांनी सुमारे पंचवीस नाटके लिहिली. त्यांच्या जन्मशताब्दी-निमित्त डॉ. धांडे यांचा एक लेख या अंकात दिला आहे. कै. मा. ना. जोशी यांच्या स्मृतीस आम्ही अभिवादन करतो.

### अभिनंदन

विख्यात मराठी साहित्यिक श्री. विश्राम बेडेकर यांच्या ' एक झाड आणि दोन पक्षी ' या आत्मचरित्रास यंदाचा साहित्य अकादमी पुरस्कार प्राप्त झाला आहे. केसरी-मराठा संस्थेनेही याच ग्रंथास केळकर पारितोषिक दिले होते. आम्ही या उचित सन्मानाबद्दल श्री. विश्राम बेडेकर यांचे अभिनंदन करतो. श्री. बेडेकर यांनी मराठीमध्ये मोजकेच परंतु मौलिक लेखन केले आणि त्या त्या वाङ्मय प्रकारावर आपला ठसा उमटविला. त्यांच्या ' रणांगण ' या कादंबरीने मराठी कादंबरीक्षेत्रात एक नवा टप्पा निर्माण केला. ' टिळक आणि आगरकर ' या नाटकात दोन उत्तुंग व्यक्तिमत्त्वांच्या जीवनातील घटना श्री. बेडेकर यांनी तितक्याच ताकदीने उभ्या केल्या. ' एक झाड आणि दोन पक्षी ' या आत्मचरित्रात एका आत्मलीन चतुरस्र व्यक्तिमत्त्वाचा परिचय घडतो. बेडेकर पति-पत्नीं 'नी आपल्या मौलिक साहित्यकृतींनी मराठी साहित्य सकस आणि समृद्ध बनविले आहे.

म. सा. परिषदेचे कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत विनोदी वाङ्मयासाठी ठेवलेले ' चिं. वि. जोशी पारितोषिक ' यावर्षी तरुण विनोदी कथालेखक श्री. विजय कापडी यांच्या ' यंव आणि त्यंव ' या विनोदी

कथासंग्रहास मिळाले. लेखकाबरोबरच पुस्तकाच्या प्रकाशकालाही हे पारितोषिक देण्यात येते. लेखक श्री. विजय कापडी आणि प्रकाशिका सुपर्ण प्रकाशनच्या सौ. सुनीता मिरासदार यांचे आम्ही अभिनंदन करतो.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे उपाध्यक्ष प्राचार्य राम शेवाळकर यांची पुढील तीन वर्षांकरिता विदर्भ साहित्य संघाच्या अध्यक्षपदी दुसऱ्यांदा अविरोध निवड झाली आहे. 'उपरा'कार श्री. लक्ष्मण माने यांना समाजशास्त्रातील अभ्यासासाठी दरमहा अडीच हजार रुपयांची होमी भाभा फेलोशिप मिळाली आहे. दैनिक मराठवाड्याचे संपादक श्री. अनंतराव भालेराव आणि कवयित्री सौ. अनुराधा पाटील यांना अनुक्रमे त्यांच्या 'पेटलेला दिवस' आणि 'तरीही' या पुस्तकांसाठी श्री. पु. ल. देशपांडे यांच्या हस्ते १९८५ सालचा 'नरहर कुरुंदकर' पुरस्कार देण्यात आला. हा पुरस्कार मराठवाडा साहित्य परिषदेच्या वतीने देण्यात येतो.

सुप्रसिद्ध साहित्यिक आणि 'भारतीय संस्कृती कोश'कार पंडित महादेवशास्त्री जोशी यांच्या वयास जानेवारीमध्ये ऐंशी वर्षे पूर्ण झाली. त्यांचे 'आत्मपुराण' हे आत्मचरित्र नुकतेच प्रसिद्ध झाले असून ते अद्यापी कोषकार्यात निमग्न आहेत. सुप्रसिद्ध कथा-कादंबरीकार श्री. वि. ग. कानिटकर यांच्या वयास साठ वर्षे पूर्ण झाली. म. सा. परिषदेचे कोषाध्यक्ष म्हणून त्यांनी काम केले आहे. आब्राहम लिंकन आणि हिटलर यांच्या जीवनावरील त्यांनी लिहिलेली चरित्रे प्रसिद्ध आहेत. सुप्रसिद्ध समीक्षक आणि कथाकार श्री. ज्ञानेश्वर नाडकर्णी यांचा फ्रेंच सरकारकडून बहुमान करण्यात आला.

महाराष्ट्राच्या साहित्यिक आणि सांस्कृतिक क्षेत्रात वैशिष्ट्यपूर्ण स्थान संपादन करणाऱ्या आणि श्री. श्री. ग. माजगावकर यांच्या संपादकत्वाखाली निघणाऱ्या 'माणूस' या साप्ताहिकाने रौप्य महोत्सवी वर्षात पदार्पण केले आहे.

अखिल भारतीय मराठी नाट्यसंमेलनाचे सहासष्टावे अधिवेशन पुसद येथे नुकतेच पार पडले. 'नाट्य-संपदा'चे प्रभाकर पणशीकर हे अध्यक्षस्थानी होते. श्री. पणशीकर यांची ह्या अध्यक्षपदावर दुसऱ्यांदा अविरोध निवड झाली.

या सर्वांच्या यथोचित बहुमानाबद्दल आम्ही त्यांचे अंतःकरणपूर्वक अभिनंदन करतो.

**.......आणि अभिवादन**

गेल्या तीन महिन्यात मराठी साहित्य सृष्टीतील अनेक नामवंत व्यक्तींचे दुःखद देहावसान झाले. दि. २६ नोव्हेंबर १९८५ रोजी 'महाराष्ट्र कवी' कविवर्य यशवंत यांचे पुणे येथे निधन झाले. दऱ्याखोऱ्यातल्या या कवीने पुण्यास येऊन मराठी काव्यसृष्टी फुलविली. भावगीतांबरोबरच खंडकाव्यांची आणि 'छत्रपती शिवराय' यासारख्या महाकाव्याची रचना त्यांनी केली. ललित आणि प्रबंधलेखनही त्यांनी केले. मराठी काव्यप्रांतात मोलाची कामगिरी करणाऱ्या 'रविकिरण मंडळा'चे ते एक अध्वर्यू होते.

मुंबई मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले. महाराष्ट्र साहित्य परिषदेशी त्यांचा दीर्घ-काळचा निकटचा संबंध होता. परिषदेची अनेक पदे त्यांनी सांभाळली. काही काळ ते 'म. सा. पत्रिके'चे संपादकही होते. मराठी कविता काव्यगायनाच्या द्वारे जनसामान्यांपर्यंत पोचविण्याच्या रविकिरण मंडळाच्या यशात कविवर्य यशवंत यांचा वाटा मोठा होता. दीर्घ काव्यलेखनाची आधुनिक कवींची क्षमताही स्वप्रयत्नाने त्यांनी सिद्ध केली. कवी साधुदासांच्या काव्याचा प्रभाव प्रारंभीच्या काळात त्यांच्यावर असला, तरी नंतर त्यांनी स्वतःचा मार्ग चोखाळला. काव्यावरील अव्यभिचारी निष्ठेमुळे त्यांनी अखेरच्या क्षणापर्यंत काव्यलेखन केले. त्यांच्या निधनाने 'रविकिरण मंडळा'तील महत्त्वाचा आणि अखेरचा दुवा निखळला आहे.

याच काळात दोन गांधीवादी विचारवंतांचे देहावसान झाले. दि. १७ नोव्हेंबरला सासवड येथे सुप्रसिद्ध गांधीवादी कार्यकर्त्या श्रीमती प्रेमाताई कंटक यांचे निधन झाले. १९३० पासून त्या स्वातंत्र्य चळवळीत होत्या. सासवड येथे १९३५ मध्ये आश्रम स्थापून अखेरपर्यंत त्या तेथेच राहिल्या. 'प्रसाददीक्षा' या पुस्तकात म. गांधीजींशी झालेला त्यांचा पत्रव्यवहार समाविष्ट आहे. त्यामुळे गांधीजींच्या सत्य, अहिंसा, सत्याग्रह या विषयीच्या कल्पना स्पष्ट झाल्या. शंकरराव देवांचे आत्मचरित्र त्यांनी संपादित केले आणि त्यांचा 'साध्य आणि साधने' हा ग्रंथही प्रकाशित केला. 'काम आणि कामिनी', 'अग्नियान' या सारख्या कादंबऱ्या

त्यांनी लिहिल्या. दुसरे गांधीवादी विचारवंत आचार्य दादा धर्माधिकारी यांचे दिनांक १ डिसेंबरला सेवाग्राम वैद्यक महाविद्यालयात निधन झाले. एक प्रभावी वक्ते म्हणून ते प्रसिद्ध होते. 'सर्वोदय' या हिन्दी मासिकाचे संपादन त्यांनी केले. त्याचप्रमाणे 'सर्वोदय दर्शन', 'स्त्रीपुरुष सहजीवन' यासारखे ग्रंथही लिहिले. म. गांधी आणि आचार्य विनोबा भावे यांच्या सहवासात ते दीर्घ काळ होते. स्वातंत्र्य चळवळ, घटना समिती आणि भूदान आंदोलन यांत त्यांचा महत्त्वाचा सहभाग होता.

सुप्रसिद्ध मराठी नाटककार श्री. मधुसूदन कालेलकर यांचे दि. १७ डिसेंबर रोजी मुंबई येथे निधन झाले. त्यांनी लिहिलेली सुमारे पंचवीस नाटके आणि शंभरावर पटकथा अत्यंत लोकप्रिय झाल्या. 'दिवा जळू दे सारी रात', 'अपराध मीच केला', 'कल्पवृक्ष कन्येसाठी' ही नाटके किंवा 'आम्ही जातो आमुच्या गावा', 'बनारसी बाबू' या चित्रपटांचा त्यादृष्टीने निर्देश करता येईल.

मुंबई मराठी साहित्य संघाचे ज्येष्ठ कार्यकर्ते श्री. बापूराव नाईक यांचे याच कालावधीत निधन झाले. मुद्रणतंत्रविद्या शास्त्रावर त्यांचा अधिकार होता. त्या संदर्भात त्यांनी महत्त्वपूर्ण लेखनही केले. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळाचे, 'विश्वकोश' मंडळाचे आणि अ. भा. मराठी साहित्य महामंडळाचे सदस्य म्हणून त्यांनी अनेक वर्षे कार्य केले. म. सा. परिषदेच्या कार्याशीही त्यांचा निकटचा संबंध होता.

गेल्या पिढीतील एक नामवंत ज्येष्ठ लेखिका मालतीबाई दांडेकर यांचे दि. १४ जानेवारीस औरंगाबाद येथे देहावसान झाले. त्यांनी अनेक कादंबऱ्या लिहिल्या. त्यातील काहींची हिंदी व कन्नड भाषात भाषांतरेही झाली. त्यांनी विपुल बालसाहित्य लिहिले आणि 'बालसाहित्याची रूपरेषा' यासारखा बालसाहित्याचे विवेचन करणारा ग्रंथही लिहिला. जळगाव येथे भरलेल्या बाल साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले होते.

जैन तत्त्वज्ञानाचे अभ्यासक आणि व्यासंगी लेखक पं. जिनदास फडकुले यांचे सोलापूर येथे दि. २४ डिसेंबर रोजी निधन झाले. 'जैन रामायणा'चा त्यांचा व्यासंग होता व त्याचा काव्यमय अनुवादही त्यांनी मराठीत केला.

पंधराव्या गोमंतक साहित्य संमेलनाचे अध्यक्ष आणि कोकणी व मराठीतील सुप्रसिद्ध साहित्यिक लक्ष्मणराव सरदेसाई यांचे वयाच्या ८१ व्या वर्षी दि. ४ फेब्रुवारी रोजी मुंबई येथे निधन झाले. कोकणी निबंधासाठी त्यांना १९८२ मध्ये साहित्य अकादमीचे पारितोषिक मिळाले होते. त्यांनी गोव्याच्या स्वातंत्र्य चळवळीत महत्त्वाचे कार्य केले होते.

जळगाव येथील सुप्रसिद्ध शिक्षणतज्ज्ञ ल. नी. तथा अण्णा छापेकर यांचे दि. ७ फेब्रुवारी रोजी निधन झाले. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या जळगाव शाखेचे ते अनेक वर्षे अध्यक्ष होते. त्यांनी शैक्षणिक व अन्य विषयांवर अनेक ग्रंथ लिहिले. कै. साने गुरुजी यांच्या जीवनावरील त्यांचा स्मृतिरूप ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहे.

सुप्रसिद्ध कथा-कादंबरीकर्त्या चारुशीला गुप्ते, कथाकार नारायण पुराणिक, शरच्चंद्र गुणे, जोशी-लोखंडे प्रकाशनाचे संचालक आणि ललित लेखक दिनकर लोखंडे अशा नामवंत साहित्यिकांचे निधन याच कालखंडामध्ये झाले. काही कृतकृत्य तर काही उमेदीच्या साहित्यिकांचा यात समावेश आहे. त्यांच्याबद्दल अनेक अपेक्षा होत्या. काहींचे नुसते अस्तित्वही दिलासा देणारे होते. या सर्वांच्या निधनाने मराठी साहित्याची मोठी हानी झाली आहे यात शंका नाही.

या सर्वांच्या स्मृतीस आम्ही विनम्र अभिवादन करतो.

म. सा. पत्रिकेचा १९८५ चा दीपावली विशेषांक 'कथाविशेषांक' म्हणून प्रसिद्ध करण्यात आला. त्याचे बहुसंख्य वाचकांनी स्वागत केले. हा अंक कुटुंबातील सर्व व्यक्तींनी वाचला, याचा आनंद अनेकांनी व्यक्त केला. 'पत्रिके'चे वैचारिक, संशोधनात्मक स्वरूप असण्यावरही कित्येकांनी भर दिला. यापुढील विशेषांक, दिवाळी अंक यांविषयीच्या आपल्या कल्पना आणि अपेक्षा वाचकांनी कळविल्या, तर त्यांचे स्वागत होईल.

—वसंत स. जोशी

# परिक्रमा / परिक्रमा / परिक्रमा / परिक्रमा

: हिन्दी भाषिक वृत्तपत्रसृष्टीचे जनक कै. मो. दि. पराडकर हे मालवण तालुक्यातील पराड गावचे होते. त्यांचे उचित स्मारक त्यांच्या मूळगावी पराड येथे उभारण्याचा शासनाचा विचार असल्याचे माहिती व जनसंपर्क खात्याचे राज्यमंत्री श्री. राममनोहर त्रिपाठी यांनी सांगितले.

: जगप्रसिद्ध कादंबरीकार अर्नेस्ट हेमिंग्वे यांची ' द गार्डन ऑफ एडन ' ही अप्रकाशित कादंबरी चार्ल्स स्क्रिब्नर्स सन्स या संस्थेच्या वतीने मे १९८६ मध्ये प्रकाशित होणार आहे. ही कादंबरी हेमिंग्वे यांनी १९४६ मध्ये लिहिण्यास प्रारंभ करून १९६१ मध्ये पूर्ण केली. ही त्यांची अखेरची कादंबरी आहे.

: बेकायदा ठरविण्यात आलेल्या सॉलिडॅरिटी युनियनशी संबंध असलेल्या अगर ज्यांना द्रोही समजण्यात येते, अशा लेखकांविरुद्ध पोलंडच्या अधिकाऱ्यांनी मोहीम उघडली आहे.

: सोविएत संघ आणि भारत यांच्या शिक्षण मंत्रालयात झालेल्या करारानुसार सोविएत महाविद्यालयांसाठी मराठी भाषेचे पहिले पाठ्यपुस्तक १९८७ साली तयार होईल, अशी माहिती या पुस्तिकेच्या सोविएत लेखिका डॉ. श्रीमती इरीना ग्लुश्कोवा यांनी दिली आहे. १९७८ मध्ये मराठी भाषेचा अभ्यासक्रमात समावेश करणारे मॉस्को विद्यापीठ हे सोविएत संघातील पहिलेच विद्यापीठ आहे.

: मुंबईच्या ' आविष्कार ' संस्थेतर्फे पुण्यात १८ डिसेंबरला नाट्यशिबिर भरविण्यात आले. लंडन येथील प्रायोगिक रंगभूमीचे श्री. डेव्हिड ग्रीव्हज् यांनी या शिबिराचे संचालन केले.

: ' गबाळ ' या आत्मचरित्रपर ग्रंथाचे लेखक श्री. दादासाहेब मोरे यांना दिल्लीच्या अशोक फौंडेशन या संस्थेने भटक्या आणि विमुक्त जमातीचा अभ्यास करण्यासाठी चार वर्षे कालावधीची शिष्यवृत्ती जाहीर केली आहे.

: सुप्रसिद्ध कथाकार आणि चरित्रकार श्री. राजा मंगळवेढेकर यांच्या अध्यक्षतेखाली बालकुमार साहित्य संमेलनाचे अधिवेशन नोव्हेंबर मध्ये पुणे येथे साजरे झाले.

: विदर्भ साहित्य संमेलनाचे ३७ वे अधिवेशन घाटंजी येथे नोव्हेंबरच्या शेवटच्या आठवड्यात श्री. मधुकर केचे यांच्या अध्यक्षतेखाली भरविण्यात आले होते.

: ऑक्टोबरच्या शेवटच्या आठवड्यात जयसिंगपूर येथे सुप्रसिद्ध कवी श्री. पी. सावळाराम यांच्या अध्यक्षतेखाली द. म. साहित्य सभेचे तिसरे अधिवेशन साजरे झाले.

: वृत्तपत्रांतून 'वाचकांचा पत्रव्यवहार' या सदरात लिहिणाऱ्या लेखकांचे राज्य पातळीवरील पहिले अधिवेशन सोलापूर येथे श्री. रंगा वैद्य यांच्या अध्यक्षतेखाली भरले होते.

: महाराष्ट्र राज्य ग्रंथालय संघाचे ३५ वे अधिवेशन जामनेर (जि. जळगाव) येथे डिसेंबरच्या २४ व २५ या तारखांस तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या अध्यक्षतेखाली साजरे झाले.

: अहमदनगर येथे दि. २८ व २९ डिसेंबर रोजी अहमदनगर कॉलेजमध्ये लोकसाहित्य परिषदेचे सहावे अधिवेशन आयोजित करण्यात आले होते. महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समितीच्या अध्यक्षा डॉ. सरोजिनी बाबर यांनी त्याचे उद्घाटन केले. नगराध्यक्ष श्री. शंकरराव घुले अध्यक्षस्थानी होते.

# परिक्रमा / परिक्रमा / परिक्रमा / परिक्रमा

: पुणे येथे डिसेंबरच्या २८ व २९ या तारखांना तेहतिसावे अखिल भारतीय गुजराती साहित्य संमेलन श्री. के. का. शास्त्री यांच्या अध्यक्षतेखाली भरले होते. पूर्वाध्यक्ष श्री. यशवंत शुक्ल यांनी त्यांना अध्यक्षपदाची सूत्रे दिली. प्रसिद्ध मराठी कवी आणि सा. 'साधना'चे संपादक प्रा. वसंत बापट यांनी संमेलनाचे उद्‌घाटन केले.

: 'महाराष्ट्र आणि कर्नाटक यांच्यातील सांस्कृतिक संबंध नेहमीच जिव्हाळ्याचे आणि देवाण घेवाणीचे राहिले आहेत. हा सांस्कृतिक अनुबंध वाढीस लागला पाहिजे' असे विचार कर्नाटकचे मुख्यमंत्री श्री. रामकृष्ण हेगडे यांनी मुंबई साहित्य संघाच्या भालेराव नाट्यगृहात बोलताना व्यक्त केले. अ. भा. नाट्यपरिषद आणि कर्नाटक शासन यांच्या सहकार्याने सादर करण्यात आलेल्या 'कन्नड विठ्ठलु' या अभिनव कार्यक्रमाच्या वेळी प्रमुख पाहुणे म्हणून ते बोलत होते.

: पुण्यातील 'साहित्यप्रेमी भगिनी मंडळ' या लेखिकांच्या संस्थेस पंचवीस वर्षे पूर्ण झाली. श्रीमती संजीवनी मराठे, शांता किर्लोस्कर, ज्योत्स्ना देवधर, पद्मा गोळे, सरिता पदकी या लेखिकांनी या संस्थेचा प्रारंभ केला. चर्चासत्रे, कविसंमेलने आदि अनेक कार्यक्रम या संस्थेकडून केले जातात.

: पुण्याच्या पुराभिलेखागारातर्फे २३ डिसेंबर ८५ ते, १ जानेवारी ८६ पर्यंत मोडी प्रशिक्षणाचे वर्ग गरवारे महाविद्यालयात आयोजित करण्यात आले होते. मोडीतील मुळाक्षरे आणि मोडीतील कागदपत्रे यांच्या वाचनाची तयारी या वर्गात करून घेण्यात आली.

: मुंबई विद्यापीठाचे माजी कुलगुरू डॉ. त्र्यं. कृ. टोपे यांची मुंबईचे शेरीफ म्हणून नियुक्ती झाली. ते म. रा. साहित्य-संस्कृती मंडळाचे सभासद आहेत.

: मेनका प्रकाशनातर्फे देण्यात येणारा पु. भा. भावे साहित्य पुरस्कार यावर्षी श्रीमती वसुंधरा पटवर्धन यांना देण्यात आला आहे. पुरस्कारात पाच हजार एक रुपये व सन्मानचिन्ह यांचा समावेश असतो.

: 'दीपावली' वार्षिकाच्या १९८४ च्या अंकात प्रसिद्ध झालेल्या 'धर्मयोद्धा' या कथेबद्दल श्री. लक्ष्मण लोंढे यांना एक हजार रुपयांचे श्री. ग. रा. वाळ पारितोषिक जाहीर करण्यात आले आहे.

: सुप्रसिद्ध मराठी साहित्यिक श्री. विश्राम बेडेकर त्यांच्या 'एक झाड आणि दोन पक्षी' या आत्मचरित्रास यंदाचा साहित्य अकादमी पुरस्कार जाहीर करण्यात आला आहे.

: औदुंबर येथे सदानंद साहित्य मंडळातर्फे ४४ वे स्नेहसंमेलन श्री. वामन चोरघडे यांचे अध्यक्षतेखाली मकरसंक्रांतीस साजरे झाले. कविसंमेलनाच्या अध्यक्षपदी सुप्रसिद्ध कवी डॉ. वि. म. कुलकर्णी हे होते.

: आजरा येथे दि. १८ व १९ जानेवारी रोजी ग्रामीण साहित्य संमेलन भरविण्यात आले होते. 'स्वामी'कार श्री. रणजित देसाई अध्यक्षस्थानी होते. 'सोवत'चे संपादक ग. वा. बेहेरे यांनी उद्‌घाटन केले.

: कऱ्हाड येथील सुप्रसिद्ध विचारवंत व लेखक श्री. ग. स. ऊर्फ दादासाहेब आळतेकर यांच्या वयास ९० वर्षे पूर्ण झाल्याबद्दल दि. १२ जानेवारीस त्यांचा सत्कार बॅ. आप्पासाहेब पंत यांच्या हस्ते करण्यात आला. त्यांचे रामदर्शन, सीतादर्शन, हनुमान दर्शन, भरतदर्शन व लक्ष्मणदर्शन हे ग्रंथ यापूर्वी प्रसिद्ध झाले असून वाल्मिकीदर्शन हा ग्रंथ भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्थेतर्फे प्रकाशित होणार आहे.



अनुक्रमणिका







# परिक्रमा / परिक्रमा / परिक्रमा / परिक्रमा

: वि. पु. भागवत स्मारक समितीतर्फे उत्कृष्ट ग्रंथप्रकाशनासाठी दिली जाणारी पारितोषिके गेल्या तीन वर्षांसाठी म्हणून कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे (१९८३), ग्रंथाली, मुंबई (१९८४) आणि श्री विद्या प्रकाशन पुणे (१९८५) या प्रकाशकांना देण्यात येणार आहेत. या प्रकाशनांच्या पुढील ग्रंथांची अनुक्रमे निवड करण्यात आली आहे. रामकृष्ण आणि विवेकानंद (वि. रा. करंदीकर) व तराळ अंतराळ (शंकरराव खरात); वाघ आणि माणूस (रमेश देसाई) व 'गांधी' (नलिनी पंडित) श्रीविठ्ठल : एक महासमन्वय (रा. चिं. ढेरे) व खिल्ली (पु. ल. देशपांडे). मानचिन्ह आणि रोख अडीच हजार रुपये असे हे पारितोषिक आहे.

: गुलबर्गा विद्यापीठातील मराठी विभाग प्रमुख डॉ. प्रा. सौ. कविता कटके यांना उस्मानिया विद्यापीठास सादर केलेल्या 'मराठी संतांच्या विराण्या' (शके १२०० ते १७००) या प्रबंधास पीएच्. डी. पदवी प्रदान करण्यात आली. डॉ. व. दा. कुलकर्णी यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी प्रबंधलेखन केले.

: उस्मानिया विद्यापीठ (हैदराबाद) येथील मराठी विभागातील डॉ. माणिकराव धनपलवार आणि प्राध्यापिका सौ. विमलाबाई थत्ते यांना 'प्रोफेसर'ची श्रेणी देण्यात आली. आता मराठीचे तीन प्रोफेसर्स असलेले उस्मानिया हे एकमेव विद्यापीठ आहे.

: दि. १२ ते १५ डिसेंबर ८५ ला नेदरलँडमध्ये 'अर्ली डिव्होशेनल लिटरेचर इन न्यू इंडो-आर्यन लन्ग्वेजीस' या विषयावर लंडन येथे आंतरराष्ट्रीय परिषद आयोजित केली होती. या परिषदेस डॉ. व. दा. कुलकर्णी (हैदराबाद) हे उपस्थित होते. 'मराठी संतांची हिन्दी पदे' या विषयावर त्यांनी निबंध वाचला.

: विदर्भ साहित्य संघाचा ६३ वा वर्धापनदिन जानेवारीच्या तिसऱ्या आठवड्यात 'लोकसत्ते'चे संपादक श्री. माधव गडकरी यांच्या प्रमुख उपस्थितीत पार पडला. अध्यक्षस्थानी प्राचार्य राम शेवाळकर हे होते.

: ख्यातनाम कन्नड साहित्यिक व संस्कृत पंडित प्रा. व्ही. एम्. इनामदार यांचे पुणे येथे दि. २७ जानेवारीस निधन झाले. वि. स. खांडेकर यांच्या लेखनाचा प्रा. इनामदार यांच्यावर विशेष प्रभाव होता. कै. खांडेकर यांच्या 'ययाति' आणि 'दोन ध्रुव' या कादंबऱ्यांचे त्यांनी कन्नडमध्ये भाषांतरही केले होते. त्यांनी सुमारे पन्नास ग्रंथ लिहिले. त्यात अठरा कादंबऱ्या आहेत.

: पुणे विभागीय ग्रंथालय संघाचे अधिवेशन दि. १५ व १६ फेब्रुवारीस इचलकरंजी येथे नाटककार प्रा. वसंत कानेटकर यांच्या अध्यक्षतेखाली पार पडले.

: अहमदनगर ऐतिहासिक वस्तु संग्रहालयाच्या वतीने देण्यात येणारा पाचशे रुपयांचा जिन्सीवाले पुरस्कार १९८४-८५ या वर्षासाठी श्री. श्रीपाद दत्तात्रय कुलकर्णी यांच्या 'आनंद तरंग' या ग्रंथास देण्यात आला आहे.

: संगीतज्ञ आणि इतिहास संशोधक कै. सरदार आबासाहेब मुजुमदार यांची जन्मशताब्दी एक फेब्रुवारीस श्री. पु. ल. देशपांडे यांच्या अध्यक्षतेखाली पुण्यात साजरी करण्यात आली.



अनुक्रमणिका






# महाराष्ट्र साहित्य परिषदेचे

## चौथे विभागीय साहित्य संमेलन आणि ८० व्या वर्धापन दिन

(दि. २५, २६ आणि २७ मे १९८६)

जुलै १९८५ पासून अधिकारावर आलेल्या महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या नव्या कार्यकारी मंडळाने दोन नवीन योजना जाहीर केल्या होत्या. एक म्हणजे परिषदेचे बंद पडलेले विभागीय साहित्य संमेलन भरविणे आणि दुसरी म्हणजे दरवर्षी सर्वोत्कृष्ट साहित्यिकाला साहित्य परिषद पारितोषिक आणि मानचिन्ह देणे. साहित्य परिषदेला येत्या २७ मे १९८६ रोजी ८० वर्षे पूर्ण होत आहेत त्या निमित्ताने वरील दोन्ही योजना कार्यवाहीत आणण्याचे कार्यकारी मंडळाने ठरविले आहे.

दि. २५, २६ व २७ मे १९८६ रोजी पुणे येथील टिळक स्मारक मंदिरात साहित्य परिषदेचे ४ थे विभागीय साहित्य संमेलन आयोजित करण्यात येईल. या संमेलन प्रसंगी साहित्यिक-सांस्कृतिक स्वरूपाचा उत्सव भव्य प्रमाणात साजरा करण्यात येणार आहे.

संमेलनाचे अध्यक्षस्थान विख्यात नाटककार **प्रा. वसंत कानेटकर** स्वीकारणार असून साहित्याचे जाणकार व कलाप्रेमी रसिक **श्री. सुशीलकुमार शिंदे** उद्घाटन करणार आहेत. दि. २७ मे १९८६ रोजी होणाऱ्या वर्धापनदिन उत्सवास प्रमुख पाहुणे म्हणून भारतीय कीर्तीचे साहित्यिक **श्री. कमलेश्वर** उपस्थित राहणार आहेत व त्यांच्या हस्ते परिषदेने यंदापासून सुरू केलेले रु. २००० चे पारितोषिक साहित्यविषयक उत्कृष्ट कामगिरी केलेल्या लेखकास देण्यात येणार आहे. या उत्सवाचे अध्यक्षपद साहित्य परिषदेचे जुने कार्यकर्ते आणि हितचिंतक **बॅ. विठ्ठलराव गाडगीळ** स्वीकारणार आहेत.

जिव्हाळ्याच्या विषयावर पत्रकार आणि लेखक यांचा परिसंवाद; विंदा करंदीकर, वसंत बापट, मंगेश पाडगावकर यांचे काव्यवाचन; परिषदेच्या काही माजी कार्यकर्त्यांचा सत्कार; स्मरणिका प्रकाशन; शंकर पाटील, द. मा. मिरासदार, वसंत सबनीस यांचे कथाकथन; नांदेड साहित्य संमेलनात गाजलेले गीतरूप बहिणाबाई आणि पं. कुमार गंधर्व यांचे गायन असा भरगच्च, आकर्षक कार्यक्रम या तीन दिवसांच्या उत्सवात आखलेला आहे.

म. सा. परिषदेच्या सर्व सभासदांनी या उत्सवात सक्रिय सहभागी व्हावे अशी आग्रहाची विनंती आहे. संमेलनाचा सर्व तपशील योग्य वेळी वृत्तपत्रातून जाहीर करण्यात येईल.

आपले

**शंकर पाटील** / अध्यक्ष ⁂ **राजेन्द्र बनहट्टी** / कार्याध्यक्ष ⁂ **म. श्री. दीक्षित** / कोषाध्यक्ष

**राजा फडणीस, म. वि. गोखले, प्रभाकर अत्रे** / कार्यवाह

अनुक्रमणिका






अनुक्रमणिका



प्रबंधलेखनाच्या निमित्ताने रविकिरण मंडळातील हयात असलेल्या कवींच्या मुलाखती, चर्चा अन् इतर माहिती घेण्याच्या निमित्ताने पूर्वपरिचय नसतानादेखील कवी यशवंतांच्या घरी मी अनेकदा गेलो. त्यातूनच (वयात अंतर असूनही) आमचा चांगला स्नेह जुळला. वेगवेगळ्या विषयांवर भरपूर गप्पा गोष्टी व्हायच्या. त्यांच्या खाजगी ग्रंथालयाचा भरपूर वापर करता आला. अनेकदा तर साहित्यविश्वाशी निगडित असलेल्या विषयापासून तो सद्यकालीन सामाजिक जिव्हाळ्याच्या विषयावर– सामाजिक मूल्यांवर– नव्या समाजजीवनातल्या संस्कारांवर आणि त्यातून उत्पन्न झालेल्या विकृतीवर आमचे समरसून बोलणे व्हायचे. आदर्श जीवनमूल्ये, समृद्ध संस्कार आणि अनुकरणशील समाजमन यांच्या चर्चेवेळी जणू ते कविताच आपल्या वाणीतून प्रकट करीत आहेत, असे वाटे. काव्यातले यशवंत आणि लौकिक जगातले यशवंत यात प्रसन्नता देणारे अद्वैत आहे, ही जाणीव त्यांच्याविषयी आदर वाढण्यास कारणीभूत झाली आणि हा आदर शेवटपर्यंत टिकला– वाढत गेला.

कुमारवयापासून एखाद्या आवडीच्या कवीच्या कविता आपण मनोमन आस्वादलेल्या असाव्यात. त्या कवितांच्या आधारे आपण आपल्या कल्पनेद्वारा त्या प्रिय व श्रद्धाशील कवीचे एक चित्र मनात उभे केलेले असावे. आस्वादलेल्या कवितेच्या अंगणात त्याच्या व्यक्तिमत्वाचे विखुरलेले चांदणे अन् त्यातूनच त्याच्या विचाराची उमटलेली पदमुद्रा आपल्या मनःचक्षूसमोर सतत ठळक होत गेलेली असावी, अन् त्या कविचित्राला– त्या मानसचित्राला दिवसेंदिवस गहिरेपणा अन् अधिक सजीवता येत जावी; मग अचानक साक्षात त्या कवीचे लौकिक जीवनात दर्शन झाल्यावर आपले अशरीरी मानसचित्र तंतोतंत सशरीर झालेले पाहाण्यात जो एक शब्दातीत आनंद असतो; जो एक विलक्षण अनुभव असतो; तो मला निदान कवी यशवंतांच्या बाबतीत तरी प्रत्ययाला आला.

हा आदर वाढत जाण्याचे महत्त्वाचे कारण म्हणजे कवी म्हणून भावविश्वात ठसलेले यशवंत आणि माणूस म्हणून जाणवलेले यशवंत यांच्या व्यक्तिमत्वात, आचार-विचारात, जीवनदृष्टीत एक जबरदस्त आकर्षणशक्ती होती. ज्या गोष्टींवर सामान्य माणूस अथवा सर्वसाधारण रसिक मनापासून प्रेम करतो; पण स्वतःच्या आचरणात आणताना तडजोड करतो, अशा अनेक गोष्टी त्यांच्या नित्याच्या आयुष्यात सहजपणे घडत असलेल्या आमच्यासारख्याला दिसत होत्या.

# महाराष्ट्रकवी यशवंत : एक स्मरण

द. ता. भोसले

निखळ आणि उच्च कोटीचे काव्यप्रेम; त्यावरच उपजीविका करण्याचा निर्धार; नव्याचा स्वीकार करीत असतानाच भूतकालीय पाथेयाचा केला जाणारा आदर; अन् या दोहोंचा जीवनसरणीत साधलेला सुरेख संगम, वाट्याला आलेल्या जीवनाचा आनंदाने स्वीकार करून त्यालाही अधिक परिपूर्ण व रुचीपूर्ण करण्याची त्यांची साधककृती; जीवनातील व्यथांनाही सौम्य करण्यासाठी त्यांनाच त्यांनी दिलेले नवनिर्मितीचे सौंदर्यात्मक रूप; सामान्य माणसाच्या वाट्याला येणाऱ्या आयुष्यासारखे सरपटणारे जीवन येऊनही त्यात निष्ठापूर्वक जोपासलेली रसिकता, ऋजुता, भावनोत्कटता, संस्कारप्रियता, मूल्यनिष्ठा आणि संवेदनशीलता; देहाला सूज आणणाऱ्या भौतिक सुखापेक्षा आंतरिक सुखाचा ठेवा जतन करण्याची मनोवृत्ती; दोष पोटात ठेवून स्नेही-सोबत्यांवर स्नेहाचा गाढ वर्षाव करण्याची धारणा; मूल्यविषयक तडजोडी वेळी स्वीकारली जाणारी बाणेदार वृत्ती; स्वतःच्या साहित्यिक व्यक्तिमत्त्वाची जाणीवपूर्वक करून घेतलेली ओळख; स्वतःच्या दुःखावर, दारिद्र्यावर सुद्धा आपली प्रतिभा मात करू शकते यावरचा दृढ विश्वास आणि निराशेतही आनंदाचे चांदणे कुटुंबियांवर सांडणारा हा कवी कुणाच्याही आदराचा नि प्रेमाचा विषय व्हावा यात नवल नाही. यशवंतांच्या सहवासात आलेला कोणताही साहित्यप्रेमी त्यांच्या उदात्त जीवनमूल्यांवर, माणुसकीवर श्रद्धा ठेवणाऱ्या वृत्तीवर, सामान्यांचा प्रतिनिधी म्हणवून घेण्यात अभिमान बाळगणाऱ्या विचारावर आणि अभंग काव्यप्रेमावर फिदा झाल्याशिवाय राहणार नाही. दोन पिढीत वयाचे अंतर असतानादेखील आमचे मैत्र इतके समृद्ध झाले नि वाढीस लागले; त्याचे हे खरे अन् महत्त्वाचे कारण म्हणावे लागेल.

रविकिरण मंडळातील कवींनी आणि विशेषतः यशवंतांनी मराठी कवितेला काय दिले; अन् काय घालविले याविषयी परस्पराविरोधी मते समीक्षकांत आढळतात. या कवींनी मराठी कविता केवळ विस्तारली—सामान्य स्वरूपाच्या पातळीवर आणली असेही म्हटले जाते. यांच्या कवितेला काळ, साहित्यपरंपरा आणि कवींची वृत्ती यामुळे काही मर्यादा पडलेल्या आहेत; यात शंका नाही. आपल्या काव्याच्या मर्यादा स्वतः यशवंतांनीही मुलाखतीच्या वेळी बोलून दाखविल्या होत्या. तरीही आशय आणि आविष्काराच्या संदर्भात या कवींची कामगिरी उपेक्षिता येणार नाही. सामान्याहून सामान्य असणाऱ्या माणसाच्या वितभर परीघ असलेल्या कौटुंबिक जीवनातील सामान्य वाटणाऱ्या अनुभवांना असामान्य अशा काव्याचा विषय बनविला हे तसे गौण स्वरूपाचे कार्य नव्हे. सामान्य माणूस अन् त्याचे भावविश्व कवितेच्या क्षेत्रात आणून ती आपली कविता आहे, असे कवितेविषयी ममत्व उत्पन्न करण्याची कामगिरी क्षुद्र म्हणता यायची नाही. थोडीफार उच्च कोटीतील अन् स्वर्गीय स्पर्श लाभलेल्या किंवा मानलेल्या प्रेमभावनेला सामान्य माणसाच्या भावविश्वाचा एक अविभाज्य घटक बनविला हेही महत्त्वाचेच म्हणावे लागेल. आविष्काराच्या आणि रचनेच्या संदर्भात नानाविध प्रयोग करण्याची भूमिका याच कवींनी स्वीकारलेली होती. सामान्य वाचकांपर्यंत कविताप्रेम पोचवून कवितेला दृढ बनविण्याचे ऐतिहासिक कार्यही यशवंत आणि इतर कवींनी फारसा डांगोरा न पिटता पार पाडलेले आहे. विस्तार केल्याशिवाय; साहित्यप्रेम दृढ केल्याशिवाय, काव्यास्वादाची एक सुजाण बैठक तयार केल्याशिवाय काव्यानुभूतींची खोली निर्माण करता येत नाही. विस्तारानंतरच खोली गाठता येते. प्रतिभाविलासाचे नेत्रदीपक खेळ जागृतपणे निरखण्यासाठी प्रथम निरीक्षण करणारे नेत्र 'तयार' व्हावे लागतात. असे नेत्र 'तयार' करण्याची कामगिरी यशवंतांनी केली. शिवाय हा कवी माझ्याच गुदमरलेल्या आणि

पिचलेल्या जीवनाचा संक्षेपणाने आविष्कार करीत आहे ही रसिकांच्या मनात जाणीव व्हावी लागते. हा कवी माझेच मनोगत अधिक चांगल्या रीतीने आविष्कृत करीत आहे याची वाचकाला प्रतीती यावी लागते. कौटुंबिक जीवनातील नित्याच्या प्रसंगातील सुप्त स्वरूपात असलेले काव्यगुण प्रासादिक वाणीने अभिव्यक्त झाले की, कविता विस्तारण्यासाठी किंवा तिचा प्रसार करण्यासाठी कोणतीही योजना आखावी लागत नाही. यशवंतांनी या साऱ्यांचा आपल्या कविधर्माला अनुसरून निष्ठापूर्वक अखेरपर्यंत पाठपुरावा केला. तिची सामान्य वाचकांच्या भावजीवनात प्रतिस्थापना केली. म्हणून ते त्या काळात कमालीचे लोकप्रिय ठरले असावेत. त्यांच्या काव्यविषयक कामगिरीची आणि लोकप्रियतेची यथार्थ चिकित्सा करण्याची ही जागा नाही, म्हणूनच स्थूलपणे या साऱ्यांचा येथे निर्देश केलेला आहे.

कवी यशवंत हे कनिष्ठ मध्यमवर्गीय कुटुंबाचे प्रातिनिधीक कवी मानले जातात. आणि हे थोडेफार खरेही आहे. या मानण्यात सुप्तपणे त्यांच्या कवितेला कुठेतरी उणेपणा देण्याचा सावध हेतू दडलेला असतो. स्वतः त्यांना आपण मध्यमवर्गीयांचे प्रातिनिधीक कवी असल्याची खंत कधी जाणवली नाही. कधीही न हटणाऱ्या दुर्धर रोगावर दररोज ६।७ गोळ्या खाल्ल्याशिवाय त्यांची प्रकृती ठीक राहात नसे. अशा प्रकारच्या गोळ्या विकत आणण्यासाठी आम्ही दोघे एकदा लक्ष्मीरोडवर निघालो असताना गप्पांच्या ओघात त्यांनीच तो अभिमान मजजवळ बोलून दाखविला होता. "मी आपणहून माझ्या जीवननिष्ठा आणि काव्यपिंड सतत जपत आलो. जोपासत गेलो. काव्यातल्या नव्या सुगीत सामील झालो नाही याचे मला तिळमात्र वाईट वाटत नाही. बदलत्या कवितेप्रमाणे प्रवृत्ती व पिंड नसताना नवी कविता करीत राहिलो असतो तर मी स्वतःची व कवितेची प्रतारणा केली असतीच; पण तुम्ही वाचक व समीक्षकांनीही त्यावर टीका केली असती. कातडे पांघरूण वाघांच्या कळपात वावरल्याने वाघ होता येत नाही अन् स्वजातीलाही मुकावे लागते." अशा स्वरूपाची प्रामाणिक प्रतिक्रिया त्यांनी त्यावेळी उत्स्फूर्तपणे व्यक्त केली होती. यामधून बरेच काही जाणून घेता येईल. याउलट आपल्या कविप्रतिभेशी अखेरपर्यंत प्रतारणा केली नाही, याचेच वैशिष्ट्य मानले पाहिजे. एखादा ग्रामीण कवी आपल्या ग्रामजीवनाशी निगडित असलेल्या काव्यात्म अनुभूतीशी प्रामाणिक राहून कवित्व करतो; एखादा दलित कवी स्वतःच्या अनुभवाला सातत्याने एकाच प्रकारे आविष्कृत करतो अथवा एखादा विशिष्ट प्रतिभासामर्थ्य असणारा लेखक त्याच एका अनुभवविश्वाचा मनःपूर्वक आविष्कार करतो; तेव्हा त्याच्या साहित्यकृतीचे आपण कौतुक करतो. आपल्या प्रतिभेशी प्रतारणा न केल्याबद्दल शाबासकी देतो. त्याच न्यायाने यशवंतांनी लिहिलेल्या कनिष्ठ मध्यमवर्गियांच्या काव्याकडे आपण पाहिले पाहिजे. केवळ त्यांच्याविषयी आदर आहे म्हणून नव्हे ! साहित्याच्या आकलनास मदत व्हावी म्हणून !

यशवंतांचे वैशिष्ट्यपूर्ण व्यक्तिमत्व आणि या प्रकारची कविता यांचा आज एका वेगळ्या दृष्टीनेही विचार करता येण्यासारखा आहे. कवितेने सामाजिक जीवनातील स्थिती-गतीची; प्रकृती-विकृतीची दखल घ्यावी की घेऊ नये याबाबतीत एकवाक्यता होणारी नाही. कवितेकडे पाहण्याचा दृष्टीकोण कुणाचा कसा; यावर या प्रश्नाचे उत्तर अवलंबून असणार. पण जीवनाला समृद्ध अन् सर्वांगसुंदर बनविणाऱ्या भावभावना आणि मूल्यांविषयीच्या आविष्काराला आविष्कृत करताना एकांगी भूमिका घेऊन भागणार नाही. ज्या जीवनमूल्यांनी; संस्कारांनी आणि चिरंतन आदर्शांनी मानवाचे मातीचे व सरपटणारे आयुष्य उंचावले जाते त्याला 'अपरत्व' लाभते. ते पूर्णत्वाकडे सरकते; अशा चिरंतन संस्कारांचे अन् जीवनमूल्यांचे कवितेचे 'कवितापण' भ्रष्ट न होऊ देता यशवंतांसारख्या कवीने चित्रण केले तर त्यालाही आजच्या काळात एक वेगळे परिणाम लाभण्याची शक्यता आहे. ही कविता एका अंगाने नवनिर्मितीचा अपूर्व असा काव्यानंदही वाचकांना बहाल करते; तर दुसऱ्या अंगाने बिघडत चाललेल्या सांस्कृतिक अन् सामाजिक जीवनातील माणसाचे 'माणूसपण' ही टिकवून धरण्याचा नकळत प्रयत्न करते. ते टिकविण्यासाठी कविता जन्माला आलेली नसते. पण त्या चैतन्यशील अनुभूतीच्या गाभ्यातच असे काही सामर्थ्य असते की, आपोआपच होत चाललेली घसरण सावरण्यास मदत होते. खऱ्या कलावंताजवळ कला आणि जीवन असा भेदच नसतो. त्याचे जीवन हीच कला असते; आणि त्याची कला हेच त्याचे जीवन असते. या न्यायाने कवी यशवंतांनी कवितेच्या आवाहनशक्तीला आणि तिच्यातील भावसौंदर्याला अधिक परिमाण दिलेले आहे असेच आपणाला म्हणता येईल. कवितेतून व्यक्त झालेल्या शाश्वत जीवनमूल्यामुळे

एखाद्याचे ' माणूसपण ' कितपत टिकते–जोपासले जाते याविषयीही मतभेद होण्याची शक्यता असली; तरी चैतन्याचा लसलसता अनुभव आणि त्याची अंगेउपांगे ज्या विविध ताणावाणांतून साकार होऊन आपणाला समृद्ध रसास्वाद देत असतात; त्यासाठी तरी या आदर्श जीवनमूल्यांचा स्पर्श रसिकमनाला होणे आवश्यक वाटते, याबाबतीत दुमत व्हायचे कारण नाही.

सामान्य माणसाची सुखदुःखे, विशेषतः दुःखे आणि निराशा कवी यशवंतांच्या काव्यात अधिकांशाने व्यक्त झालेली असल्याने त्यांना साहित्यबाह्य कारणापोटी अधिक लोकप्रियता मिळाली असा एक विचार काही वेळा ऐकायला येतो. सामान्यांची दुःखे यशवंतांनी कळवळ्याने व्यक्त केली; तशी इतर अनेक कवींनीही ती काव्यविषय बनविली आहेत. त्यांच्या काव्याचा स्थूलपणे स्थायीभाव दुःख आणि निराशा हाच असतो; हे नाकारण्यातही अर्थ नाही. पण सामान्य माणसांच्या दुःखाला कवितेचा विषय कोणी बनविला नाही ? १९२० नंतरच्या जवळजवळ साऱ्या कवींनी तोच विषय बनविलेला आहे. कराडच्या साहित्यसंमेलनात भाषण करताना कै. भाऊसाहेब खांडेकरांनी नेमक्या याच मर्यादेवर बोट ठेवलेले होते. पण त्यातूनही प्रामाणिकपणे ( समर्थन करायचे म्हणून नव्हे ) असे म्हणता येते की, प्रत्येक कालखंडाची काही विशिष्ट दुःखे असतात. त्या दुःखाला त्या त्या कालखंडातील कवी आपोआपच वाचा फोडण्याचे काम करीत असतो. असा वाचा फोडणारा कवी त्या समाजाला आपोआपच प्रिय बनून जातो. केशवसुत, मर्ढेकर ही मंडळी या संदर्भात लक्षात घेता येतील. तेव्हा यशवंतांना मिळालेली लोकप्रियता ही त्या कालखंडाच्या जडणघडणीचा एक परिपाक म्हणून दाखविता येईल. यशवंतांनी ही कालदुःखे अधिक उत्कटतेने व समरसतेने व्यक्त केली असे फारतर म्हणता येईल. त्यात ती आत्मनिष्ठेच्या अंगाने अधिक व्यक्त झाल्याने त्यांना आवाहनक्षमता अधिक स्वरूपात प्राप्त झालेली आहे. शालीन पण समर्थ आत्मनिष्ठा; भाषेची दिमाखदार ऐट आणि अनेक भावगुणांचा तीव्र पण मोहक संगम या कारणांनी त्यांच्या उदास सूर छेडणाऱ्या कवितेलाही लोकप्रियता व प्रतिसाद मिळत गेला.

यशवंतांच्या काव्यात जुन्या आणि नव्याचा जाणीवपूर्वक मिलाफ साधलेला आपणास जाणवतो. त्या विशिष्ट वाङ्मयीन परिस्थितीच्या संदर्भात ही गोष्ट एका परीने आवश्यकच म्हणावी लागेल. त्यांना इतिहासाविषयी सार्थ अभिमान आहे; पण वृथा दुरभिमान नाही; पुराण, महाभारतातील जीवन उन्नत करणाऱ्यावार्तांवर अढळ प्रेम आहे; त्यातील गतार्थ भाकडकथांवर विश्वास नाही; समर्थ रामदासांच्या विचारधनावर ते पोसलेले असले तरी, परंपरेचा कालबाह्य अभिमान त्यांनी कवटाळलेला नाही; ते परंपरेतील शाश्वताचा स्वीकार नि निकृष्टाचा धिक्कार करतात. रोमँटिकता आणि अभिजातता यांचा ते मेळ घालतात. समाजजीवन आणि व्यक्तीजीवन; प्रेमजीवन अन् मानव्य यांच्यात ते द्वैत मानत नाहीत. अशा रीतीने आविष्काराच्या बाबतीतही आपल्या प्रतिभाधर्माला अनुसरून ते यथाशक्ती प्रयोग करीत आलेले असल्याने नवकाव्याच्या या काळातही त्यांचा म्हणून एक चाहता वर्ग टिकून आहे याची आपणाला जाणीव होते.

यशवंतांच्या कवितेचा बव्हंशी सूर उदासीनतेचा अन् निराशेचा असल्याने त्यांच्या कवितेचे मूल्यमापन करणाऱ्या काही समीक्षकांनी यशवंतांची कविता ही ' किरकिरी ' कविता आहे असे म्हटलेले आहे. त्यांच्या सामाजिक जाणिवा व्यक्त करणाऱ्या कवितेत अशा प्रकारची निराशा व कडवट भावना प्रकट झालेली आहे, यात तथ्य आहे. पण हे व्यक्त झालेले दुःख आणि त्यामागील निराशा सूक्ष्मपणे पाहिली पाहिजे असे वाटते. ही निराशा आणि कडवट भावना वैयक्तिक सुखलालसेपोटी निर्माण झालेली नाही. अथवा वैयक्तिक स्वप्नांचा अपेक्षाभंग झाल्याने निर्माण झालेली नाही. स्वतःच्या व्यक्तिमत्वाचा मनःपूत विकास साधण्याच्या आड येणाऱ्या आणि व्यक्तिस्वातंत्र्याला करकचून आवळून टाकणाऱ्या सामाजिक व्यवस्थेविरुद्धची आहे. रूढी आणि निरर्थक परंपरा यांना धरून ठेवणाऱ्या समाजाचा बिघडलेला समतोल, माणसाला पशूसमान जीवन जगण्यास भाग पाडणारी समाजनीती; भीषण स्वरूपाची आर्थिक विषमता, माणसा–माणसात दरी उत्पन्न करणारा श्रेष्ठकनिष्ठ भाव, शोषक आणि शोषित, मालक आणि गुलाम, उच्च आणि नीच यामुळे विकृती झालेली जीवनसरणी; पतित स्त्रियांचा दुबळा आक्रोश, जीवनात निर्माण झालेली मूल्यविहिनता, नकली मूल्यांना दिली जाणारी प्रतिष्ठा यामुळे व्यथित झालेले कवीचे मन आपल्या मनातला त्वेष, चीड आणि निराशा प्रकट करीत होते.

आदर्श जीवनमूल्यांवर सुसंस्कारित झालेले यशवंतांचे उत्कट मन आणि सामाजिक पुरोगामित्वाला मनःपूर्वक पाठिंबा देणारे त्यांचे व्यक्तिमत्व मानवतेची होणारी विटंबना पाहून जेव्हा व्यथित होते; तेव्हाच "जगा तुझी सारी तऱ्हाच उफराटी" म्हणून निराश बनते. ही निराशा सिनिक स्वरूपाची नसते. परिपूर्ण जीवनाचे स्वप्न त्यातून उदयाला येणार असते. निराशेच्या आधारेच आशेचे किरण प्रकाशमान होण्याची आस बाळगलेली आहे. ही निराशा एका मानव्यप्रेमाचा ध्यास घेतलेल्या कविमनाची आहे. जीवनावर उदंड प्रेम करणाऱ्या जीवनप्रेमिकाची आहे. अप्राप्यासाठी व्याकुळ झालेल्या आत्म्याची ही निराशा आहे. त्यांचा प्रतिभाधर्मच असा सामाजिक जीवनातील विसंगती आणि स्खलनशीलता प्रकट करणारा आहे. ही निराशा म्हणजे स्थितीशील आणि गतिशील, टाकावू आणि टिकावू यांच्यात द्वैत निर्माण झालेल्या मनाचे दर्शन आहे. त्यात पुन्हा हे द्वैत त्यांनी आत्मनिष्ठ स्वरूपात प्रामुख्याने व्यक्त केलेले असल्याने अनेकांना याचा संबंध त्यांच्या वैयक्तिक लौकिक जीवनाशी लावण्याचा मोह झालेला असावा, असे वाटते. वास्तविक पाहता यशवंतांची या प्रकारची कविता ही खऱ्या अर्थाने सामाजिक जाणिवेचीच कविता आहे. पण प्रा. गो. वि. करंदीकरांनी म्हटल्याप्रमाणे, 'सामाजिक जाणिवेची कविता म्हणजे तुतारीसदृश कविता असे समीकरणच काही काळ रूढ होऊन बसले. काही कवी अभावितपणे त्याच्या आहारी गेले. सामाजिक जाणिवांची कविता ही आवाहनात्मक, उद्दीपक आणि वक्तृत्वानुसारीच असते, असे सुलभ समीकरण टीकाकारांनी मांडले. त्यामुळे सामाजिक जाणिवेची वेगळी जीवनदर्शी कविता घडविणे, तिच्या वेगळ्या काव्यात्मतेचा वेध घेणे टीकाकारांनाही कठीण होऊन बसले."

"परंपरा आणि नवता" पृ. १७८

मराठी काव्यप्रवाहात विविध अंगांनी मोलाची भर घालणाऱ्या आणि सामान्य माणसांच्या जीवनातील असामान्य असे भावानुभव व्यक्त करीत त्या मनाला सुसंस्कारित करणाऱ्या कवी यशवंतांचे काव्यातील स्थान मोलाचे आहे असेच म्हणावे लागेल. पूर्णतः केवलावयवी आणि क्षणाक्षणाला नवता उत्पन्न करणारी शुद्ध सौंदर्यात्मक अनुभूती आजच्याप्रमाणे त्यांच्या काव्यात फारशी जाणवणार नाही हे खरे असले तरी मराठी कवितेपुरता अभिजातवाद, वास्तववाद आणि सौंदर्यवाद यांचा संगम साधून मानवी जीवनातील सर्वस्पर्शी भावनांचा अन् कारुण्याचा त्यांनी मनःपूर्वक आविष्कार केला. ऐहिक निष्ठांचा स्वीकार करूनही त्यांची कविता दिव्यत्वाचा आणि पूर्णत्वाचा ध्यास घेणारी आहे, असेच म्हणता येईल. म्हणूनच एक आत्मनिष्ठ कवी संस्कृतीच्या संचिताचा प्रतिभाशाली भाष्यकार होऊ शकतो यावर आपला विश्वास बसतो. ■

## साभार स्वीकार : लेख, प्रबंध

**घरंदाज गायकी** : वा. ह. देशपांडे; मौज प्रकाशन, मुंबई; १९८५ (१ आवृत्ती), रु. ४० △ **अत्तरसुगंध** : कृ. द. दीक्षित; मौज प्रकाशन, मुंबई; १९८५; रु. ४१ △ **उमाळा** : प्रमोद नवलकर; रविराज प्रकाशन, पुणे ३०; १९८५; रु. ३० △ **पेरी मेसनचं भूत** : अनंत मनोहर; रविराज प्रकाशन, पुणे ३०; १९८५; रु. २० △ **साहित्यसंवेद** : चंद्रशेखर कपाळे; कर्नाटक राज्य म. सा. प. प्रकाशन, गुलबर्गा २; १९८५; रु. २० △ **केशिराज व्यास : व्यक्ती आणि वाङ्मय**; धारा प्रकाशन, औरंगाबाद; १९८३; रु. ३५ △ **आलेपाक** : अरविंद गोखले; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८५; रु. ३० △ **लो. टिळकांचे राजकीय विचारधन** : ना. र. इनामदार; पुणे विद्यापीठ प्रकाशन, पुणे ७; १९८५; रु. १६ △ **विदर्भ साहित्य संमेलन अध्यक्षीय भाषणे** : तु. ना. काटकर-संपा.; विदर्भ साहित्य संघ, नागपूर; १९८३; रु. ७५ △ **इन्किलाब** : सुरेन्द्र बारलिंगे; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८५; रु. ६० (राजकीय लेख).

## साभार स्वीकार : नाटक-समीक्षा-धार्मिक-प्रवास व इतर

**पहिला बाजीराव (नाटक)** : ना. स. वापट; सौ. इंदुमती वापट, कर्वे रोड, पुणे ४; १९८५; रु. ३० △ **उर्जायन** : द. ग. गोडसे; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; १९८५ रु. ३० △ **ज्ञानदेवांचा आत्मसंवाद** : वि. रा. करंदीकर; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे ३०; १९८५ रु. ५० △ **मॉरिशस डायरी** : प्र. श्री. नेरुरकर; महाराष्ट्र मॉरिशस मित्रमंडळ, वांद्रा (पू.) मुंबई ५१; १९८५, रु. ६० △ **सीलिसवर्गची पत्रे** : विश्राम बेडेकर; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई १९८५; रु. ३० △ **धूमकेतूची स्वारी** : डॉ. प्रभाकर कुंटे; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; १९८५ रु. २५ △ **शोध विज्ञान कोश** : डॉ. दु. का. संत; पुणे विद्यार्थी गृह प्रकाशन, पुणे ३०; १९८५ रु. १५० △ **साहित्य संघाची पन्नास वर्षे** : शं. ना. अंधृटकर; मुंबई मराठी साहित्य संघ मुंबई; १९८५ रु. २५ △ **मुंबई मराठी साहित्य संघ स्मरणिका सुवर्णमहोत्सव १९३५–१९८५** : संपादित; मुंबई मराठी साहित्य संघ, मुंबई; १९८५.

## साभार स्वीकार : कविता

**पुष्पगंधा** : य. द. भावे; पुष्पा भावे, प्रभादेवी, मुंबई २५; १९८५; रु. ३२; △ **अशी मी अशी मी** : प्रा. डॉ. लीला गोळे; डॉ. स्वर्णलता भिशीकर; ज्ञानप्रबोधिनी, पुणे ३०; १९८५; रु ८. △ **घोडे** : प्रसन्नकुमार पाटील; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे ३०; १९८५; रु. १५. △ **गझलात रंग माझा** : खावर; पारिजात पब्लिकेशन शिवाजीनगर, पुणे ४; १९८५; रु. १० △ **मेघचाफा** : अरविंद हसमनीस; अजिंक्य प्रकाशन; यादोगोपाळ पेठ सातारा; १९८५; रु. ५. △ **पंखांना जटायूचा वारसा** : मोहन पोतदार व रमेश पोतदार; सौ. विजया पोतदार, राजगुरुनगर; पुणे; १९८५; रु. १२. △ **आईची कविता** : श्री. वि. जोशी; माया प्रकाशन, खणभाग, सांगली; १९८५; रु. २०. △ **जयकृष्ण केशव उपाध्ये यांची कविता १८८३/१९९३** : डॉ सौ. आशा सावदेकर, संपा; विदर्भ साहित्य संघ, नागपूर; १९८५; रु. ३०. △ **प्रेषित** : सुरेंद्र भोसले; संकल्प प्रकाशन, कुर्ला; १९८५; रु. १०. △ **विवर्त** : प्रभा गणोरकर; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; १९८५; रु. ३०. △ **शांतता आणि मैत्री** : धों. वे. जोगी; राजेंद्र जोगी, अंधशाळेजवळ, जळगाव; १९८५; रु. ५.

# मला भावलेले
# ‘ एक झाड आणि दोन पक्षी ’

आत्मचरित्र लिहिताना बेडेकरांनी मुंडकोपनिषदामधल्या एका मंत्राचा उपयोग केला आहे. या मंत्राप्रमाणे, जीवनाच्या वृक्षावर दोन पक्षी असतात. पैकी एक जीवन जगतो, भोगतो, सोसतो. दुसरा ते फक्त बघतो, तटस्थपणे त्यावर चिंतन करतो. दुसऱ्या पक्षाची भूमिका घेऊन त्यांनी सर्व लेखन केले आहे.



दोन पक्ष्यांची ही क्लृप्ती बेडेकरांनी का वापरली? मला वाटते, की सर्व जीवनवृत्त त्रयस्थपणे सांगता यावे, त्याचे खोल चिंतन व्हावे, त्यावर वेळोवेळी भाष्य करता यावे, म्हणून बेडेकरांनी ही क्लृप्ती वापरली असावी. शिवाय झाडावरचे दोन पक्षी म्हणजे झाडाचीच अंगे आहेत, असे बेडेकर मानीत असावे. जीवनाचे निवेदन करणारा, त्यावर सतत टीकाटिप्पणी करणारा दुसरा पक्षी म्हणजे बेडेकरांच्याच मनाचा एक भाग आहे. तेव्हा, आपले परिपूर्ण दर्शन घडावे म्हणूनही पक्ष्यांना आत्मचरित्रात त्यांनी वाव दिला असावा. हे आत्मचरित्राचे झाड या दोन पक्ष्यांच्या वागडण्याने नि चिवचिवाटाने सतत हलत बोलत राहिले आहे.

पण दोन पक्ष्यांची ही क्लृप्ती सध्याच्या आविष्काराला आवश्यक होती का? त्यामुळे आत्मचरित्राच्या कलेत काही अर्थपूर्ण भर पडते का?

जीवनाची वाट थोडीफार चालून गेल्यावरच आत्मचरित्राचे लेखन होऊ शकते. साहजिकच आत्मचरित्रकाराच्या वर्तमानकालीन परिणत ‘ मी ’ने भूतकालीन, विकासमान ‘ मी ’वर टाकलेला एक व्यापक दृष्टिक्षेप म्हणजे आत्मचरित्र, असे म्हणता येईल. म्हणजे, बहुतेक सर्व आत्मचरित्रात दोन ‘ मी ’ विद्यमान असतातच. कुठे ते दोघे ‘ मी ’ म्हणून पुढे येतात, तर कुठे अनामिक होऊन पडद्याआड वावरत राहतात, इतकेच. हे दोन ‘ मी ’ सामान्यतः उपलब्ध असताना बेडेकरांनी दोन ‘ पक्षी ’ तेथे आणण्याचे काय प्रयोजन? त्यांच्या दुसऱ्या पक्ष्याने आज त्रयस्थपणे जीवनाचे अवलोकन करण्याचे, त्यावर भाष्य करण्याचे, चिंतनाचे जे काम केले आहे तेच काम सद्यःकालीन, परिणत ‘ मी ’करू शकला असता. त्याने भूतकालीन विकासमान ‘ मी ’बद्दल जे काही सांगितले असते त्यात पहिल्या पक्ष्याचे सर्व चरित्र येऊन गेले असते. वास्तवात दोन ‘ मी ’ असतात; पण दोन ‘ पक्षी ’ नसतात. शिवाय जीवनाच्या वृक्षापेक्षा ‘ पक्षी ’ वेगळे वाटतात. त्या वृक्षाचेच अंग वाटत नाहीत. पण दोन ‘ मीं ’चे तसे नाही. ते जीवनच असतात नि वाटतातही. तेव्हा,



अनुक्रमणिका

द. न. गोखले

क्लृप्ती योजणे, त्यासाठी मुंडकोपनिषदात शिरणे, वगैरे कृत्रिम नि निरर्थक दिसते. दोन 'मी' मुळे निवेदन वास्तवाच्या अधिक जवळ आले असते; नव्हे, वास्तवच झाले असते; असे मला वाटते.

पहिला पक्षी कालासह वदलला, वाढत गेला, असे बेडेकरांना दाखविले आहे; आणि ते योग्यच आहे. पण त्यांचा दुसरा पक्षी वदलत नाही, वाढत नाही, हे कसे? वास्तविक पाहता तोही विकास पावला पाहिजे. पण त्याला स्थिर ठेवून त्याने परिणत, सद्यःकालीन 'मी'शी ते नकळत ऐक्य कल्पितात. दोन पक्ष्यांऐवजी दोन 'मी' गृहीत धरले, की दुसरा मी वर्तमानकालीन असल्याने स्थिर असू शकतो. पहिला 'मी' वाढतो आणि त्याच्या वाढीत जीवनाची वाढही सामावली जाते. पण दोन 'पक्षी' गृहीत धरले, साक्षी असणारा दुसरा पक्षी आरंभापासून मानला, की जीवनासह त्याच्यात परिवर्तन कसकसे झाले ते सांगण्याची जबाबदारी लेखकावर येते. बेडेकरांनी या जबाबदारीकडे काणाडोळा केला आहे,असे वाटते. त्यांच्या सुंदर पुस्तकाला हे गालबोट लागले आहे.

दुसऱ्या पक्ष्याचे स्थिरपण हा दोष असला, नि दोन पक्ष्यांची कल्पनाच मुळात थोडीफार आक्षेपार्ह असली, तरी एकदा ती कल्पना स्वीकारल्यावर बेडेकर शेवट-पर्यंत सामर्थ्याने ती पेलून धरतात. शिवाय, पक्षी नि वृक्ष यांत असणारे वेगळेपण लोपावे म्हणून की काय, त्यांनी पहिल्या पक्ष्याला 'हा' म्हटले आहे आणि दुसऱ्याला 'मी' बनवून 'हा'विषयी सर्व कथन केले आहे. त्यामुळे, 'हा'ची गोष्ट 'मी' स्वतःच्या भाष्यासह सांगत जातो, 'हा' पक्षी नि जीवनवृक्ष यातील वेगळेपण जाणवत राहात नाही, आणि 'हा' नि 'जीवन' अभिन्नपणे पुढे पुढे जातात.

जीवनाचा तळ शोधण्याची क्षमता असली, मनोगत परिणामकारी शब्दांत उतरविण्याची शक्ती असली, की कोणाही माणसाला चांगलं आत्मचरित्र लिहिता येईल, असं म्हणतात. त्या म्हणण्यात पुष्कळ तथ्य आहे, यात शंका नाही. पण खुद्द जीवनाची वेधकता, हा आत्म-चरित्राची गुणवत्ता ठरविणारा आणखी एक महत्त्वाचा घटक आहे, असे मला वाटते. ज्याचे जीवन सरधोपट आहे, ओकेबोके आहे, नीरस, बेचव नि चाकोरीबद्ध आहे, त्याच्यापाशी बाकी कितीही गुण असले तरी त्याचे आत्मचरित्र उत्तमात बसणार नाही, अशी माझी धारणा आहे. उत्तम आत्मचरित्रकाराला आवश्यक असणारी 'वेधक' जीवनाची ही देणगी बेडेकरांना अपरंपार लाभलेली आहे. ज्यामुळे जीवन वेधक व्हावे, चित्ताकर्षक व्हावे, अशा अनेकविध गोष्टी बेडेकरांनी अनुभवल्या आहेत किंवा पाहिल्या आहेत.

त्यांनी दोन लग्ने केली. पहिली पत्नी जिवंत असता स्त्रियांच्या स्वातंत्र्याचा उद्घोष करणाऱ्या एका बुद्धि-मान, बंडखोर स्त्रीसह त्यांचा दुसरा विवाह झाला. त्यांनी विवाहबाह्य निस्सीम स्त्रीप्रेमाचा नि स्त्रीसह-वासाचा अनुभव घेतला. स्त्रीचा द्वेष, जळफळाट त्यांनी सहन केला नि स्त्रीच्या उत्कट भगिनीप्रेमातही ते न्हाऊन निघाले. त्यांच्याकडून यत्किंचित प्रतिसाद नसताना त्यांच्यावर आषक होणाऱ्या स्त्रिया त्यांना भेटल्या नि त्यांच्यावर विशेष प्रेम न करणारी माताही त्यांना लाभली. त्यांची उभी हयात नाटकात नि चित्रपट व्यव-सायात गेली. त्यामुळे मुलखावेगळ्या, चित्रविचित्र, Colourful व्यक्ती तर त्यांना इतक्या बघायला मिळाल्या की सांगता सोय नाही. बाबूराव पेंढारकर, शांतारामबापू, बाबूराव पै, शांता हुबळीकर, दीनानाथ, कोल्हटकर आणि कितीतरी! त्यांनी जीवाभावाचे, गळयात गळा घालणारे, नि केव्हा तरी गळ्याला तात लावणारे मित्र मिळवले नि तोडलेही. श्रीराम, गबूदादा, हरी मोटे यांसारखे! थोरामोठ्यांच्या जीवनाशी त्यांचा दुरून किंवा जवळून पण जिव्हाळ्याचा संबंध आला. लो. टिळक, विनोबा, भगतसिंग दत्त, आगरकर वगैरे! त्यांच्या चारित्रक्रमात अनेक उलथापालथी आहेत, देश-विदेश आहेत, भ्रमंती आहे, उत्तमोत्तम साहित्याने नि चिंतनाने फुललेले क्षण आहेत, आसक्ती आहे नि विरक्तीही आहे, विशेष म्हणजे परिस्थितीला सतत प्रतिसाद देणारे एक दणकट, प्रतिभाशाली, मानी, अहंपूजक, सुसंस्कृत, अनोखे मन आहे! या सर्वांमुळे त्यांचे चरित्र इतक्या रीतींनी मुळातच वेधक झालेले

आहे की त्यांचे आत्मचरित्र वेधक न उतरणे जवळ-जवळ अशक्यच होते.

चरित्र मुळात वेधक असले तरी त्याची वेधकता शब्दांकित होण्यासाठी आत्मचरित्रकाराजवळ शब्दांकनाची कला नि कुशलता हवी. मनात जे जे जसजसे येईल, ते ते तसतसे परिणामकारक रीतीने सांगितले म्हणजे शब्दांकन सर्वार्थाने साधले असे म्हणता येणार नाही. शब्दांकनाची जी कला नि कुशलता आहे तिच्या कक्षेत, मनोगताची निवडानिवड करणे, नि त्याची मांडणी करणे हा भागही समाविष्ट होतो. आत्मचरित्रात काय सांगावे, आत्मचरित्राचा नेमका आशय कोणता असावा, या विषयाचा मराठीत विशेष विचार झाल्याचे दिसत नाही. बेडेकरांनीही या विषयाचा खास विचार केला असेल असे नाही. पण त्यांच्यातील कलावंताने त्या विषयाचा अचूक वेध उत्स्फूर्तपणे घेतला आहे. आपल्यातील ' स्व 'ला जे भिडले, जे झोंबले, ज्याने स्व-जीवनाला वळण लावले, स्व-जीवनावर ठसा उमटवला, ' स्व '–ने जे मनापासून अनुभवले, ' स्व '–ला जे विशेष भावले, स्वतःच्या भावजीवनात जे पार मिसळून गेले, ते ते सर्व आत्मचरित्रकाराचा विषय होय, असे म्हणता येईल. ' स्व 'नि ' स्व 'शी जिव्हाळ्याने निगडीत झालेल्या गोष्टीच आत्मचरित्रात आल्या पाहिजेत, असे मला वाटते. बेडेकरांचा एक डोळा ' स्व 'वर नि दुसरा डोळा ' स्व 'शी जिव्हाळ्याने निगडीत झालेल्या गोष्टींवर आहे. पण ते नाटककार, कादंबरीकार, चित्रकथालेखक, चित्र-दिग्दर्शक, किंबहुना कलासृष्टीत मुरलेले कलावंत असल्या-मुळे त्यांना तिसराही एक डोळा फुटलेला आहे. हा तिसरा डोळा सदैव रंजक, वेधक, चित्तचक्षुचमत्कारिक गोष्टींवर खिळलेला असतो आणि आपले लेखन वाचनीय व्हायला हवे म्हणून जपत असतो. त्यामुळे या पुस्तकात आत्म-चरित्राचा गाभा बराचसा सामावलेला असला तरी त्यासह काही भाग त्यात असाही शिरला आहे की जो आत्मचरित्राला अपरिहार्य नाही. शिवाय बेडेकर कितीही मनस्वी असले तरी त्यांच्यात एक सावध व्यवहारी पुरुष दडलेला आहे. त्या पुरुषाने, आत्मचरित्रात अपरिहार्य वाटणारा काही भाग या पुस्तकातून गाळायलाही बेडेकरांना भाग पाडले आहे. म्हणजे, ' स्व ' आणि ' स्व 'शी जिव्हाळ्याने निगडीत झालेल्या गोष्टी, एवढाच या पुस्तकाचा आशय नाही. त्यात थोड्याशा अप्रस्तुत गोष्टी जादा आल्या आहेत, आणि त्यातून थोड्याशा प्रस्तुत गोष्टी गळल्या आहेत. मात्र असे असले, तरी प्रस्तुतापेक्षा दोन्ही प्रकारचे अप्रस्तुत एवढे अल्प आहे की, आत्मचरित्राने काय घ्यावे नि काय टाळावे याचा एक नवा आदर्श बेडेकरांनी मराठीत घालून दिला आहे असे वाटते. पुस्तकातील जवळजवळ सर्व आशय बेडेकरांनी आपल्या अंतर्जीवनाभोवती फिरवत ठेवल्यामुळे या आत्मचरित्राला एक गहिरी एकरूपता लाभली आहे आणि ते कुठेही पसरट, पाणचट किंवा पोचट झालेले नाही. या आत्मचरित्रातून पूर्वजांना नि जन्मघटनेच्या स्वतंत्र उल्लेखाला फाटा मिळाला आहे; नोकरीचे आद्यन्त नि कालखंड यासंबंधीच्या सनावळ्या मावळल्या आहेत; प्रवासवर्णने नि स्थलवर्णने लुप्तप्राय झाली आहेत; राजकीय पक्ष किंवा सामाजिक पक्ष किंवा विचारसरणी, किंवा मते बाजूला पडली आहेत; परमतखंडन नि स्वमतमंडनही जवळजवळ अंतर्धान पावली आहेत; उपदेश नि संदेश तर औषधालाही उरलेला नाही; हे सर्व लक्षणीय आहे. मराठी आत्मचरित्राच्या परंपरापुनीत आशयाला कोणते क्रान्तिकारक वळण हे आत्मचरित्र लावू शकेल त्याचे काही प्रत्यंतर यात मिळू शकते. या आत्मचरित्रात आपण कुठूनही, कोणत्याही आशय-खंडाच्या द्वारातून प्रवेश केला तरी आपल्याला थेट आत्म-चरित्रकाराच्या हृदयाशी, गाभाऱ्यापाशी पोचता येते.

वर उल्लेखिलेल्या जादा अप्रस्तुताविषयी आता थोडे सांगायला हवे. बेडेकर मुरब्बी कलावंत असल्यामुळे या आत्मचरित्रात रटाळ, कंटाळवाणा, बेचव भाग त्यांनी मुळीच येऊ दिलेला नाही. त्यामुळे जे वेधक नि वाचनीय आहे त्यातूनच अप्रस्तुत निवडावे लागते. अर्थात, सर्व-सामान्य वाचकाला हे अप्रस्तुत खुपेलच असे नाही. जे वेधक नि वाचनीय असते तेही अप्रस्तुत असू शकते, हा विचार चित्तात बाळगून; नि आत्मचरित्राच्या आशया-संबंधी काही कल्पना मनात धरून; जो कोणी काळजी-पूर्वक या आत्मचरित्राचा आशय तपासील त्यालाच हे अप्रस्तुत सापडू शकेल. मला स्वतःला या पुस्तकात, बेडेकरांच्या अंतर्जीवनाशी न भिडलेला काही भाग केवळ रंजक म्हणून जागा अडवून बसला आहे, तो अप्रस्तुत आहे, असे वाटते. उदाहरणार्थ, ' लक्ष्मीचे खेळ ' या चित्रपटाची कथा ( पृ. १२८ ), किंवा ' प्रभात 'मधील कॅमेऱ्याच्या क्लृप्त्या ( पृ. ८३ ), किंवा ' ज्ञानेश्वर ' चित्रपटात बेडेकरांना मिळावयाचे होते ते रेड्याचे काम ( पृ. १७५ ) वगैरे गोष्टी मला रंजक पण अप्रस्तुत

वाटल्या. बेडेकर कुशल लेखक असल्यामुळे त्यांनी या गोष्टी दूरान्वयाने ' स्व 'पर्यंत नेऊन पोचवल्या आहेत. पण त्यात रंजन जास्त, विषयवेध कमी, असाच शेवटी हिशेब निघतो. नाटक किंवा चित्रपट यांच्या सृष्टीतील बेडेकरांनी सांगितलेल्या काही कथा किंवा episodes, त्यांनी ऐकवलेले काही किस्से, किंवा त्यांनी रंगवलेली काही व्यक्तिचित्रे ' आत्म 'कथनापेक्षा विनोदनावर दृष्टी ठेवून आकार घेतात, असा ग्रह होतो.

या पुस्तकात जे प्रस्तुत अपरिहार्य असूनही गळाले आहे, ते मात्र सामान्य वाचकालाही खटकू शकेल. बाळूताई खरे या वंडखोर, विदुषी लेखिकेशी बेडेकरांनी दुसरे लग्न केले आणि गेली ४०–५० वर्षे त्यांच्यासह संसाराची सुखदुःखे अनुभवली. पण या सहजीवनाचे त्यांनी काढलेले पुस्तकातील चित्र फार अपरे, तुटके नि धावते आहे. सहजीवनातील काही स्नेहमय नि संघर्षमय भाग, काही तळपते नि तेवते क्षण त्यांनी मोठ्या सामर्थ्याने शब्दरूप केले आहेत हे खरे, पण वाचकाची रास्त जिज्ञासा ते अतृप्तच ठेवतात./ बेडेकरांसारख्या मानी, मनस्वी, आत्मलीन नि अहंताखोर माणसाशी त्या तापट, तेजस्वी तडित्लतेचे कसे जमले असेल ? कोण, केव्हा शरण जात असेल ? पडते घेत असेल ? दोघात वैचारिक देवाण-घेवाण होई का ? कशी होई ? संसारात श्रमविभागणी कशी होत होती ? मुले झाल्यावर दोघातील संबंधात फरक पडला का ? कोणता पडला ?– यांसारखे अनेक प्रश्न बेडेकरांशी आत्मसंबंध जडलेल्या त्यांच्या वाचकांच्या मनात उत्पन्न होतात; पण बेडेकरांच्या ' स्व 'शी निगडीत असूनही ते अनुत्तरित राहतात. ' या पुस्तकातील आशय मैत्रीच्या सूत्रात गुंफलेला आहे आणि त्या सूत्रात बाळूताईसह केलेला संसार, प्रेमव्यवहार वगैरे बसत नसल्यामुळे त्याला वाव मिळाला नाही ' वगैरे समर्थन दिखाऊ नि लंगडे वाटते. कारण या पुस्तकाचा मैत्री हा एकमेव किंवा सूत्र-भूत विषय नाही; आणि तो आहे, असे गृहीत धरले तरी मैत्रीतही बाळूताईंचा समावेश व्हावयास हवा होता. बाळूताई प्रेयसी नि पत्नी होत्या, म्हणजे मित्र नव्हत्या का ?

मात्र, हे अपरिहार्य प्रस्तुत गळाल्यामुळे पुस्तकात काही महत्त्वाची उणीव राहून गेली असली, तरी तीबद्दल मी बेडेकरांना फार दोषी धरणार नाही. आत्मचरित्र-काराला जसे वाङ्मयीन तसेच व्यावहारिक जीवन असते आणि आपला उरलेला जीवनकाळ त्याला या व्यावहारिक जगातच लोटावयाचा असतो. आपले सारे सांसारिक जीवन वाङ्मयाच्या चव्हाट्यावर उघडे मांडल्याने बेडेकरांना जर आपले वैयक्तिक भावी जीवन गढुळेल, डुचमळेल, कलहाने कदाचित पेटेल, असे वाटले असेल, तर त्या सांसारिक जीवनाला आवृत ठेवण्याचा अधिकार त्यांनी खचित मिळवलेला आहे. ते एक आत्मचरित्रकार असूनही त्यांना तेवढी सवलत मी आनंदाने देईन.

आत्मचरित्र लिहून आत्मचरित्राच्या काही महत्त्वाच्या भागावर पडदा टाकणे एकंदरीने योग्य नव्हे. पण आत्म-चरित्रकाराने किती उघडे व्हावे, यालाही काही मर्यादा असली पाहिजे. बाळूताईंविषयी काही गोपन सोडले तर बेडेकर एवढे उघडे झाले आहेत की त्यांच्या त्या धाडसाचे आश्चर्य नि कौतुक वाटावे. आपल्या लिखाणाने त्यांनी अनेकांची मने दुखावली असतील नि अनेकांना संतप्त केले असेल. अशा अनेकांपैकी हरीभाऊ मोटे, बाबूराव पेंढारकर, बाबूराव पटेल, ना. सी. फडके, वि. स. सुखटणकर वगैरे व्यक्ती काळाच्या पडद्याआड गेल्या असल्यामुळे बेडेकर सुरक्षित आहेत, असे म्हणता येईल; पण कृष्णाबाई मोटे, गजानन जहागीरदार, शांताराम-बापू वगैरे व्यक्ती हयात आहेत ना ? आपल्यावर प्रेम करणारी अभिनेत्री (पृ. २३२, २३८, २४६, २५८) एक प्रशस्त समीक्षक बाई ( पृ. २१९ ) वगैरे व्यक्तींचा नामोल्लेख बेडेकरांनी टाळला असला तरी त्या व्यक्ती अद्यापी त्यांना केव्हातरी भेटत असतील ना ? पण व्यावहारिक जीवनातल्या रागालोभाची, किंवा कोर्ट-कचेऱ्यांची पर्वा न करता बेडेकरांनी विलक्षण वाङ्मयीन धाडस दाखवून आपले जीवन, स्वतःला दिसले तसे, अगदी नग्न स्वरूपात, वाचकांना दाखवले आहे आणि–

" खऱ्या कवीने हृदयावरचा पडदा दूर करावा
निंदो अथवा स्तवो जन, कवी वर्णो मानवभावा."

हा ज्ञानकोशकार डॉ. केतकरांचा बाणा नकळत पुढे चालवला आहे.

{आपल्या उलथापालथीच्या नि वळणावाकणांच्या जीवनात बेडेकरांना अनेकविध व्यक्ती भेटल्या आणि त्या व्यक्तींना त्यांनी केवळ चर्मचक्षूंनी बघितले नाही तर भेदक मर्मवेधी अंतचक्षूंनीही बघितले.\ या पुस्तकातील पाचवंचवीस व्यक्तिचित्रे मराठीला भूषणभूत ठरावीत इतकी सरस उतरली आहेत, याचे कारण

बेडेकरांची, अंतरंगाचे नाना रंग सहज बघणारी, कलावंताची नि मानससंशोधकाची, माणसाच्या उक्तिकृतीत प्रवेशणारी दृष्टी होय. या दृष्टीमुळेच त्यांच्याशी कोरडेपणाने वागणारी पण त्यांच्यावर आतून प्रेम करणारी त्यांची आई आपणाला दिसू शकते. उदार शिक्षक नि कुशल प्रशासक म्हणून गाजलेल्या प्रिन्सिपल टॉस्टोव्हिनमधला मुरब्बी राज्यकर्ता आपण बघू शकतो. मास्टर दीनानाथांमधील प्रेमळ पित्याचे, कृतज्ञ मित्राचे, व्यवहारी जगातही सहजतेने नाटकातील उदात्त भूमिका वठविणाऱ्या नटाचे, नि साडेतीन रुपयांसाठी गळ्यातली सारी ईश्वरी धनदौलत एका परिचिताच्या उंबऱ्यावर ओतणाऱ्या गंधर्व-गायकाचे आपणाला दर्शन घडते. या दृष्टीमुळेच शांतारामबापूंसारख्या थोर यशस्वी चित्रपतीचे कलाकारांची कसोटी पाहणारे विचित्र नि जीवघेणे मार्ग आपणाला समजतात आणि हा एवढा धनाढ्य चित्रनिर्माता पैशाला कसा चिकट आहे, हाताखालच्या माणसांना कसे ओरबाडून घेतो ते आपल्या मनावर बिंबते. बाबूराव पेंढारकरांचे शुद्धीमधले एक जग नि मद्याच्या बेशुद्धीमधले दुसरे जग बघून आपण स्तिमित होतो. विख्यात वाङ्मयकार ना. सी. फडके यांच्यावरील 'प्रतिभासाधना'च्या वेळचा वाङ्मयचौर्याचा खटला प्रसिद्ध आहे; पण बेडेकरांच्यामुळे फडक्यांचे आणखी एक छुपे, अर्धेकच्चे वाङ्मयचौर्य आपल्या दृष्टीस पडते. बेडेकरांच्या अंतर्वेधी दृष्टीमुळेच बाळूताईसारखी तेजस्वी ज्वालाही बाळासाठी कशी हळुवार होते, कोमल वेलीसारखी स्वतःच्या जीवनाला कसा आधार शोधते, ते न्याहाळता येते. विवाहित पुरुषावर जाणूनबुजून प्रेम करणारी नि दुसऱ्या स्त्रीच्या संसारसुखावर दरोडा घालणारी प्रेमिका किती उदार नि उदात्त असू शकते तेही बेडेकरांची दृष्टीच वाचकांना दाखविते. वृक्षाचे मूळ जसे सहजप्रेरणेने पाणी शोधीत जाते तशी बेडेकरांची दृष्टी मानवी मनाचे मर्म शोधीत जाते. बेडेकरांना कोणताही राजकीय पक्ष नाही, सामाजिक पंथ नाही, वाङ्मयीन संप्रदाय नाही, वैचारिक मठ नाही. ते एकटे आहेत. ते जीवनात स्वैरपणे डुंबलेले आहेत, किंवा त्यांनी जीवनाशी हवीतशी दांडगाई केलेली आहे. त्यामुळे त्यांच्या नैसर्गिक, मर्मवेधक दृष्टीला कुठल्याच बाह्य साच्याचे बंधन पडलेले नाही आणि ती चौफेर, चपळ नि पृथगात्म राहिलेली आहे.,

हे आत्मचरित्र म्हणजे 'खाजगी हेवेदावे उगवण्याची खटपट' नव्हे का, अशी शंका स्वतः बेडेकरांनीच एके ठिकाणी व्यक्त केली आहे (पृ. २९६). या आत्मचरित्राचे रूपान्तर अनेक ठिकाणी 'आत्मसमर्थनात' झाले आहे, असा आक्षेपही काही समलोचनातून व्यक्त झाला आहे. या आत्मचरित्रातील खरेखोटेपणाबद्दलही वाद डोकावू लागले आहेत. मलादेखील एकदोन ठिकाणी असे वाटले, की बेडेकर मनातला राग व्यक्त करण्यासाठी आपल्या अहंतेचे टेपर विशिष्ट व्यक्तीवर ठेवण्यासाठी, किंवा शिवशिवणाऱ्या दातांनी कडकडून चावा घ्यावा म्हणून लिहीत आहेत. तोच त्यांचा मुख्य उद्देश नसला तरी आत्मकथनाच्या ओघात तो उद्देश मिसळून गेला असावा. विशेषतः कृष्णाबाई मोट्यासंबंधी त्यांनी जे लिहिले आहे त्यात त्यांच्यामधील सत्यशोधक, प्रांजल निवेदक लोपला आहे, असे वाटले.

पण बेडेकरांच्या बाजूने असेही म्हणता येईल, की त्यांच्या निवेदनात मुख्यतः सत्यदर्शनाचीच प्रेरणा आहे. आत्मचरित्र हे अन्ततः घटित सत्यावरच आधारेलेले असले पाहिजे. ते जेवढे 'साहित्य' आहे, तेवढेच 'इतिहासही' असले पाहिजे. पण एकच सत्य चार प्रामाणिक निरीक्षकांना चार प्रकारचे दिसते ना? आत्मचरित्र हा लेखकाचा निर्मळ आत्माविष्कार हवा, असे मानले जाते ना? मग, आत्मचरित्रकाराने स्वतःला जे जसे दिसले ते तसेच सांगायला नको का? त्यातही आत्माविष्कार साधला जात नाही का? तेव्हा, बेडेकरांनी जे काही सांगितले आहे ते इतरांनी वेगळे सांगितले आहे, असा मुद्दा उपस्थित करून, आपला व्यासंग विस्तृत नि तौलनिक आहे, असे दाखवता येईल. पण तेवढ्याने बेडेकर खोटे ठरू शकणार नाहीत. बेडेकरांनी ज्या घटनांविषयी लिहिले आहे त्यांपैकी काही घटनांविषयी हरिभाऊ मोट्यांनी, चिंतामणराव कोल्हटकरांनी, बाबूराव पेंढारकरांनी वगैरे लिहिले आहे. तेव्हा तुलनेने बेडेकरांच्या म्हणण्यातील सत्यासत्य तपासता येईल. स्वतंत्र संशोधन करूनही बेडेकरांचे निवेदन कितपत यथातथ्य आहे, ते पडताळता येईल. पण शेवटी असा काही भाग राहीलच की ज्याचे स्वरूप द्रष्ट्याच्या दृष्टीवर अवलंबून असेल. मला वाटते, की बेडेकरांवर 'खाजगी हेवेदावे उगवल्याचा' किंवा तत्सम आरोप करताना, हा विवेक जागृत ठेवला पाहिजे. याचा अर्थ असा नव्हे, की बेडेकरांनी जे जे लिहिले आहे ते ते सत्य म्हणून पत्करावे आणि त्यात

इतरांपेक्षा काही वेगळेपणा दिसला, सत्यसंशोधनानंतर काही सदोष भाग आढळला तर तो 'द्रष्टयाच्या दृष्टी'वर सोपवून मोकळे व्हावे! यापूर्वी म्हटल्याप्रमाणे, आत्मचरित्रात एक लेखन-समकालीन प्रगल्भ 'मी' पूर्वकालीन, विकासमान 'मी' कडे बघत असतो. जोपर्यंत हे दोन मी वेगळे असतात, निवेदक 'मी' दुसऱ्या 'मी'ची (पूर्वकालीन 'मी'ची) 'कड' घेत नाही, तोपर्यंत निवेदन सामान्यतः योग्य मार्गाने जात आहे, असे समजायला हरकत नाही. मात्र जेव्हा हे दोन 'मी' एकच पक्ष घेतात, तेव्हा कान टवकारून समीक्षकाने निवेदनाच्या प्रांजळपणाविषयी साशंक झाले पाहिजे. या भूमिकेवरूनच येथे बेडेकरांचे निवेदन एकंदरीने प्रांजळ आहे; पण अगदी अपवादात्मक ठिकाणी ते दूषित वाटले असे म्हटले आहे.

दुसऱ्या कोणत्याही वाङ्मयप्रकारापेक्षा आत्मचरित्रात लेखकाच्या परिपूर्ण व्यक्तित्वाचे महत्त्व विशेष असते. मग हे व्यक्तित्व शब्दांकनामधील असो किंवा जे काही शब्दांकित केले जाते त्यामधील असो. परिपूर्ण व्यक्तित्वाच्या या चित्रणात बेडेकर खूपच यशस्वी झाले आहेत. एखाद्या शोभादर्शकाच्या नळीतून आपण काच-तुकड्यांच्या जशा अनेक, गुंतागुंतीच्या, रंगीबेरंगी, नि नित्यनूतन आकृती बघतो तसे बेडेकर या पुस्तकाच्या नळीतून आपल्या 'स्व'ची अनेक, चिवटीवावटी, गहनगूढ, क्षणोक्षणी बदलती रूपे न्याहाळतात. येथे, त्यांनी न्याहाळलेल्या 'स्व'चा सर्वांगीण सारांश देण्यात तथ्य नाही; पण त्यांनी 'स्व'चे दर्शन किती नि कसे घडवले आहे, ते स्पष्ट होण्यासाठी येथे त्या 'स्व'ची काही दखल घ्यावयास हवी.

आपले दर्शनी रूप कसे आहे, ते बेडेकरांनी सांगितले आहे. बालपणापासून आपल्याला मैत्रीची ओढ किती होती आणि मैत्रीनेच सर्वात जास्त नि खोल आघात आपल्या जीवनावर कसे केले, याचे गहिरे चित्र त्यांनी रंगवले आहे. त्यांचे व्यक्तित्व वाङ्मयवेडे आहे, शब्दांच्या खेळात रंगणारे आहे, साहित्याच्या नि चित्रपटाच्या निर्मितीत गुंग होणारे आहे. जिद्द, स्पर्धाळू वृत्ती ही त्यांच्या रोमरोमात भिनलेली आहे, आणि मौज ही, की जिद्दीने त्यांची निर्माणशक्ती पेटून उठते. ते आत्मलीन आहेत, अहंपूजक आहेत, स्वाभिमानी आहेत, आणि अहंताखोरही आहेत. त्यांचा मानीपणा असा पिळदार नि पेचदार आहे, की समोरच्या माणसावर टेपर टवण्यासाठी, त्याच्यापुढे आपली श्रेष्ठता प्रस्थापित करण्यासाठी, ते प्रसंगी पैशावर नि श्रेयावरही पाणी सोडतील; दुसरा पुढे जातो, हे बघून ते धुसफुसतील, मत्सराने जळतील, आणि प्रचंड आत्मविश्वासाने भरधाव पळू लागतील. मात्र, दुसऱ्याचे वाईट करावे, ही त्यांची बुद्धी नाही. मित्रप्रेमाचे त्यांना अप्रूप आहे; पण स्त्री-प्रेमाचे त्यांना वावडे नाही. जसे मित्रप्रेमात तसेच स्त्री-प्रेमातही ते वाहवत गेलेले आहेत आणि हाती घेतलेल्या कामाच्या प्रवाहातही ते वारंवार ओढले गेले आहेत. हा मनुष्य हरहुन्नरी आहे, कसबी नि कलावंत आहे, बुद्धिवान नि प्रतिभावान आहे; पण हा क्षमाशील नाही, उदार नाही, दुसऱ्यासाठी झिजणारा नाही. याला दुसऱ्याचे दुःख दिसते; स्वतःची कला दुःखितांचे अश्रू पुसू शकत नाही, म्हणून हा खंतावतो; आपण आपल्याच पांढरपेशा सुखवस्तू जगात सुखाच्या उबेत डोळे मिटून जगत आहोत, याची याला जाण आहे; पण मानवाच्या सेवेसाठी सर्वस्वाचा होम करण्याचे याला सामर्थ्य नाही, आणि प्रेरणाही नाही. हा सामान्यातला एक असामान्य नि असामान्यातला एक सामान्य आहे!

बेडेकरांच्या या आत्मशोधामध्ये "आत्मनिर्भर्त्सनेचा गडद सूर भरून राहिला आहे" असे एका समीक्षकाला वाटते; तर या आत्मशोधाचे "आत्मसमर्थनात रूपांतर" होते, असे दुसऱ्या समीक्षकाला वाटते. मग या पुस्तकात आत्मनिर्भर्त्सना आहे की, आत्मसमर्थन आहे? मला वाटते की, दोन्हीही नाहीत, दोन्ही असलीच तर गौण आहेत. माझ्या मते या पुस्तकात मुख्यतः आत्मशोध आहे, आत्मदर्शन आहे. जेव्हा आत्मशोध प्रखर होतो तेव्हा तो काहींना आत्मनिर्भर्त्सनेसारखा वाटतो, तर काहींना आत्मसमर्थनासारखा वाटतो! प्रखर प्रकाश दिपलेल्या डोळ्यांना अंधार वाटावा, तसे हे आहे. आत्मशोध करता करता केव्हा तरी मनुष्य स्वतःच्या उणीवांपर्यंत, दोषांपर्यंत येऊन पोहोचतो. तो प्रामाणिक कलावंत असेल, तर आत्मचरित्रात त्याला या उणिवा नि हे दोष यांचे दर्शन घडवावेच लागते. अशा वेळी त्याच्या मनात काही मूल्यश्रेणी वसत असल्यामुळे तो या उणिवा नि दोष गुण म्हणून मांडूच शकत नाही. दुर्गुण म्हणूनच त्यांचे वर्णन करावे लागते. त्यामुळे 'आत्मशोध' म्हणजे 'आत्मनिर्भर्त्सना' आहे, असे वाटू लागते. पण हे दुर्गुणवर्णन जोपर्यंत आत्मशोधाचा एक अपरिहार्य परिणाम म्हणून पुढे येते, जोपर्यंत

वाङ्मयीन आविष्कारातच सामावलेले असते, जोपर्यंत, व्यावहारिक वर्तनावर त्याचा काही परिणाम झालेला दिसत नाही, तोपर्यंत त्याला 'आत्मनिर्भर्त्सना' हे ठसठशीत नाव द्यावे किंवा नाही, याबद्दल मी साशंक आहे. 'आत्मशोधा'त 'आत्मसमर्थना'चा जो भास होतो त्याचे कारण म्हणजे दोघांत बहुधा आढळणारे साहचर्य होय. रोजच्या व्यवहारात अनेकदा 'स्पष्टीकरणा'ने 'समर्थना'चे काम होते. 'स्पष्टीकरणा'ला आपण 'समर्थन' समजतो; आणि वास्तविकपणे काही वेळा 'स्पष्टीकरणा'त 'समर्थन' असतेही. त्यामुळे प्रत्येक 'स्पष्टीकरण' म्हणजे 'समर्थन' होय असे आपणाला वाटू लागते. 'आत्मचरित्र' हा 'स्व'शी निगडीत झालेला वाङ्मय प्रकार असल्यामुळे त्यात आत्मचरित्रकाराला 'स्व'च्या सर्व लक्षणीय उक्तिकृतींचे 'स्पष्टीकरण' द्यावे लागते. लेखक नि 'स्व' एकच आणि हे 'स्पष्टीकरण' उत्कृष्टपणे देण्यास लेखकच पात्र असतो. इतरांच्या उक्तिकृतींचे स्पष्टीकरण आत्मचरित्रकार देत नाही, असे नाही. पण 'स्व'च्या बाबतीत स्पष्टीकरणासाठी तो आत्मनिरीक्षणाचे जसे साह्य घेऊ शकतो तसे इतरांच्या बाबतीत घेऊ शकत नाही. अर्थात त्याचे 'स्व' संबंधी स्पष्टीकरण नेहमीच उजवे ठरते मग 'स्पष्टीकरणा'ला 'समर्थन' समजू लागलेल्या आपणासारख्यांना वाटते की, आत्मचरित्रातील 'स्पष्टीकरण' म्हणजे 'आत्मसमर्थन'च आहे! बेडेकरांच्या पुस्तकात काही समीक्षकांना जे 'आत्मसमर्थन' दिसते, त्याचे हे एक कारण असावे. बेडेकरांनी कुठेही आत्मसमर्थन केलेले नाही, असे माझे म्हणणे नाही. पण त्यांच्या तथाकथित आत्मसमर्थनाची काही उदाहरणे वेचून जेव्हा मी ती उलगडून बघितली तेव्हा मला असे वाटले की, हे तथाकथित आत्मसमर्थन जर पुस्तकातून सर्वच्या सर्व गाळले तर पुस्तक 'स्व'च्या स्पष्टीकरणाला गमावून बसेल आणि या आत्मचरित्राचा आत्माच हरवल्यासारखे होईल.

चरित्र आणि आत्मचरित्र हे वाङ्मयप्रकार इतिहास नि साहित्य या दोहोंनी सामायिकात व्यापलेल्या प्रदेशात वास्तव्याला असतात. त्यामुळे त्यांच्यातील सृष्टी 'वास्तव', 'मानवी व्यक्तींनी'च नेहमी गजबजलेली असते. चरित्रात नायक मध्यवर्ती असतो तर आत्मचरित्रात नायकाच्या जागी 'स्व' येतो. ही सृष्टी जर समूर्त, सजीव नि समृद्ध व्हावयाची असेल तर माझ्या दृष्टीने लेखकाला तीन प्रक्रिया यशस्वीपणे पार पाडाव्या लागतात : (१) वास्तव व्यक्तींचे, त्यांच्या उक्तिकृतींचे, मनोव्यापारांचे विश्लेषण, (२) विश्लेषणामधून हाती लागलेल्या सत्याचे पुन्हा वास्तवसूचक पण झळझळीत संश्लेषण, आणि (३) विश्लिष्ट नि संश्लिष्ट सत्याचे परिणामकारक नि शक्य तेवढे गोचर शब्दांकन. या तीन्ही प्रक्रिया बेडेकरांना उत्कृष्ट साधलेल्या आहेत. काही वेळा त्या इतक्या सहज साधून जातात की, त्यांचे अस्तित्व किंवा वेगळेपण त्यांनाच नव्हे, तर वाचकांनाही जाणवू नये. 'स्व'चे नि इतर व्यक्तींचे विश्लेषण त्यांनी कसे खोल नि विस्तृत गेले आहे त्याचे दिग्दर्शन यापूर्वी थोडेफार होऊन गेले आहे. पण विश्लिष्ट सत्याचे संश्लेषणही ते सहज करू शकतात, हे आवर्जून सांगितले पाहिजे. त्यांच्या पुस्तकातील पाचपन्नास व्यक्तिचित्रे नि 'स्व'चे चित्रण म्हणूनच सुसंगत, एकसंध नि आपापल्या ठिकाणी पूर्ण वाटते. शब्दांकनाची जी तिसरी प्रक्रिया तिचा विचार यापुढे थोडाफार होणार आहे. मानवी मनाचे बेडेकरांनी केलेले विश्लेषण नि संश्लेषण, त्यातल्या त्यात 'स्व'चा त्यांनी घेतलेला शोध, इतका व्यापक, तत्त्वस्पर्शी नि सूक्ष्म आहे की त्याची बरोबरी मराठीतील फारच थोड्या वाङ्मयकृतीत आढळू शकेल. या बाबतीत मराठी आत्मचरित्रात बेडेकरांनी घातलेली भर मला महत्त्वाची वाटते.

आशयाने अभिव्यक्तीचा घाट ठरावा, ही कलाविषयक अपेक्षा या आत्मचरित्रात पुरी होते. 'स्व' आणि 'स्व'शी जिव्हाळ्याने निगडीत झालेल्या गोष्टी हाच या आत्मचरित्रातील मुख्य आशय आहे. त्यामुळेच आत्मचरित्रात परंपरेने घुसलेले कितीतरी भरताड या आत्मचरित्रातून बाहेर फेकले गेले आहे. अर्थातच अशा आशयाशी सुसंगत असा निवेदनक्रम (हा अभिव्यक्तीचाच एक भाग) बेडेकरांनी स्वीकारला आहे. "हे आत्मकथन म्हणजे जाणिवेचा अनिरुद्ध असा एक प्रवाह आहे" असे एका समीक्षकाने म्हटले आहे; पण ते मला पटत नाही. मला तर वाटते, की आशयानुरूप निवेदनक्रम ठेवण्याचा हा एक योजनाबद्ध आणि चातुर्यपूर्ण प्रयत्न आहे. 'स्व'चे जीवन वळणेवाकणे घेत घेत कसे पुढे गेले, 'स्व'चे व्यक्तित्व कसे विकसत किंवा बदलत किंवा उलगडत गेले, ते कालक्रमाने दिसावे, म्हणून बेडेकरांनी निवेदनाचे कालखंड पाडले आहेत आणि ते कालखंड कालक्रमानेच हाती घेतले आहेत.

त्या त्या कालखंडातील आशय 'मुख्यत:' त्या त्या खंडाची हकीकत देतानाच सांगितला आहे. पण अनेकदा विशिष्ट कालखंड हाती घेतला की त्याचे निवेदन कालखंडाच्या मर्यादा ओलांडून पुढे किंवा मागे जाते. या त्यांच्या येरझारा वर्ण्य विषयानुसार, अनुभवानुसार, किंवा भावानुसार होतात, यात शंका नाही. या येरझारांमुळे ते वर्ण्यसूत्र तुटू देत नाहीत. म्हणजे, कालखंड क्रमाने घेऊन त्यांनी कालानुसारी विकास जाणवावा अशी सोय एकीकडे केलेली आहे आणि कालखंडात आवश्यक तेथे येरझारा घालून वर्ण्यसूत्रही अतूट राखले आहे. इतर कोणत्याही आत्मचरित्रापेक्षा त्यांच्या आत्मचरित्रात या येरझारा विपुल आहेत, म्हणून त्यांचे निवेदन म्हणजे "जाणिवेचा अनिरुद्ध प्रवाह" आहे, असा भास उत्पन्न होतो. कृत्रिमतासुद्धा सहजता वाटावी ही बेडेकरांच्या कलेची किमया होय. कालखंड नि येरझारा, हे बेडेकरांचे थोडेफार वैशिष्ट्य आहे; पण त्याहून त्यांचे मोठे वैशिष्ट्य मला वेगळेच वाटते. कोणताही कालखंड हाती घेतला की त्यातील संपूर्ण, सलग वृत्तान्त बेडेकर सांगत नाहीत किंवा त्यातील सर्व परंपरागत विषयांचे विवरण करीत बसत नाहीत. 'स्व' नि 'स्व'शी जिव्हाळ्याने निगडीत झालेल्या गोष्टींसंबंधीच ते बोलतात. (क्वचित अप्रस्तुत पण चित्तवेधक, रंजक आशयही ते आपल्या बोलण्यात गुंडाळून घेतात.) त्यामुळे सर्व आशय 'स्व'च्या (नि वाचनीयतेच्या) सूत्रात छान गुंफला गेला आहे. बेडेकरांची ही एकंदर निवेदन पद्धतीही मराठी आत्मचरित्राच्या विकासात मला लक्षणीय वाटते.

बेडेकरांच्या आविष्कारातील गती आणि नाट्य हे दोन गुण माझ्या मनावर विशेष ठसले. विशिष्ट विषयसूत्रानुसार आशय निवडला गेल्यामुळे निवेदनाला जशी आपोआप गती आली, तशीच गतीची जाण असल्यामुळेही गती आली असावी. कॅमेरा फिरता ठेवावा किंवा दृष्य हलते ठेवावे हे चित्रपटातील तंत्र अंगी मुरल्यामुळे की काय, आशयाचा ओघ बेडेकर कुठेही तुंबू देत नाहीत, तो सारखा वाहता नि खळाळता ठेवतात. हे तीनशे पानी पुस्तक त्यामुळेच केव्हा संपले, ते लक्षातही येत नाही. गती मंद झाली किंवा खुंटली तर वाचकाला कंटाळा येतो, आणि गती फार वाढली तर आशय वाचकाच्या डोक्यावरून जातो. श्री. बेडेकरांनी गतीची ही दोन्ही टोके टाळली आहेत नि गतीचा वेग हवा तेवढाच राखला आहे. शेवटी शेवटी, गतीचा वेग फार वाढल्यामुळे निवेदन वाचकाच्या जाणिवेला ईषत् स्पर्श करून टणटणा उडत राहते (उदा० पृ. ३०४) नि रांगोळीच्या ठिपक्यांसारखे तुटक होते, हा अपवाद होय.

आविष्कारातील नाट्याविषयी काय सांगावे? सर्व पुस्तक, पानापानात नाट्यमयतेने नटले आहे. प्रत्येक भाग खटक्या खटक्यांनी सांगितला जातो, त्यातील साम्य-विरोध धारकन वाचकांच्या मनावर येऊन आदळतो, त्याची रचना बहुधा अशी असते, की तीमध्ये चढती किंवा उतरती श्रेणी जाणवावी. त्याचा शेवट केव्हा चमत्कृतीपूर्ण असतो; केव्हा उत्कंठावर्धक असतो. त्यातील संवादात चातुर्य नि चमकदारपणा यांच्या ठिकल्या उडत राहतात. सुभाषितवजा, अर्थगर्भ वाक्यांनी त्याचे एखादे अंग उजळलेले असते. नाट्याचे जे जे म्हणून विभ्रम असतील ते ते सर्व बेडेकरांच्या लेखणीला अवगत आहेत आणि त्या विभ्रमांनी वाचकाला खिळवून ठेवण्याचे अपार कौशल्य तिच्या अंगी भिनलेले आहे.

पण आत्मचरित्राने इतिहासाशी इमान राखले पाहिजे. आत्मचरित्रात जर कल्पित मिसळले तर आत्मचरित्राची कादंबरी होईल. त्याच्या विश्वासार्हतेला तडा जाईल. हे सारे नाट्य बेडेकरांच्या जीवनात, त्यांनी घेतलेल्या अनुभवात, रंगवितलेल्या व्यक्तींत, त्यांच्या 'स्व'मध्ये, खरोखरच होते का, आहे का, अशी शंका यावी, इतके हे नाट्य देखणे नि झळझळीत आहे. वारंवार मला असे वाटून गेले, की जीवन एवढे नाट्यमय असू शकते का? त्यातील घटनांचा असा कलात्मक आकृतिबंध जुळतो का? त्यातील व्यक्ती अशा सतत विस्मय, उत्कंठा, विरोध यांचे चमत्कार दाखवीत जातात का? तुमचे-आमचे जीवन असे रोचक नि रंजक असते का? सामान्यांच्यापेक्षा बेडेकरांचे जीवन मुळातच अधिक नाट्यपूर्ण असेल, हे मला मान्य आहे. आत्मचरित्रासाठी त्या जीवनात निवडानिवड झाल्यामुळे ते आणखी नाट्यपूर्ण वाटत असेल, हेही मी समजू शकतो. पण, पैलूदार हिऱ्यांच्या चमचमत्या हारासारखे ते अंगोपांगी क्षणोक्षणी झळकत राहावे, हे मला तितकेसे पटत नाही. आत्मचरित्रात पूर्ण वास्तवाचे जे आश्वासन मिळायला हवे, ते नखशिखान्त नाट्याने नटलेले हे चरित्र मला निःशंकपणे देत नाही. बेडेकर पृ. १६३ च्या प्रारंभी म्हणतात, "माझे हे निवेदन चरित्र आहे की कादंबरी?" खऱ्या

आठवणींची टिंबे आपण कल्पनेने जोडली आहेत, हे ते सरळच सांगतात. कोणाही आत्मचरित्रकाराला तसे करावेच लागते. पण त्यांच्या कल्पनेने नुसती टिंबे जोडली, की टिंबे उत्पन्नही केली? त्यांच्यासारख्या निर्मितिक्षम कलावंताचा काही भरवसा धरवत नाही!'

'एक झाड आणि दोन पक्षी' हे आत्मचरित्र मला फार आवडले. त्याच्या वाचनात घालवलेला माझा प्रत्येक क्षण आनंदाने उजळून निघाला होता. पण पुस्तक वाचून बाजूला ठेवले तेव्हा मी काठोकाठ तृप्त होतो का? मला शंका आहे. अपूर्णतेचा, अतृप्तीचा, अर्ध्यावर तुटल्याचा, रितेपणाचा काही अनुभव मला आला.तो का यावा? तीनचार दिवस एका लोकविलक्षण व्यक्तीच्या सहवासात राहून त्या व्यक्तीचे जीवन मी जणू जगत होतो. त्या व्यक्तीचे जीवन विविध अनुभवांनी भरलेले होते. व्यक्तित्व मुलुखावेगळे, वाङ्मयसमृद्ध, नि एकीकडे जोमदार तर एकीकडे संवेदनाक्षम होते. त्यामुळे मला 'माझेपण' विस्तारल्याचा प्रत्यय आला होता. माझेपण नुसते विस्तारलेच नव्हते, तर समृद्धही झाले होते. मग अपूर्णता कसली होती? जे उन्नत नि उदात्त आहे त्याच्या दिशेने माझी वाढ झाली नव्हती. माझे मन पहिल्यापेक्षा जास्त उदार नि शुद्ध झाले नव्हते. अर्धांगाने पछाडलेल्या अगदी हलक्या नोकराच्या घरी जाऊन त्याची विचारपूस करण्याची माणुसकी या आत्मचरित्रकाराच्या अंगी होती; पण हा आत्मचरित्रकार म्हणजे महारोग्यात जाऊन राहणारा, त्यांची सेवा करणारा, नि त्यामुळे स्वतःला महारोग लागला तर आनंद मानणारा कोणी फादर डेमियन नव्हता. अठराविश्वे दारिद्र्य या माणसाने बघितले होते; हा माणूस प्रतिभावानही होता;पण 'ला मिझरेबल' लिहिणारा व्हिक्टर ह्यूगो हा नव्हता. दुसऱ्यावर कुरघोडी करण्यासाठी किंवा स्वतःच्या अहंतेला जपण्यासाठी या माणसाने अनेकदा सर्वस्वावर लाथ मारली होती. पण ज्या लोकमान्यांच्या जीवनावर याने एक उत्तम चित्रपट काढला होता त्या लोकमान्यांप्रमाणे देशासाठी निष्काम कर्मयोग स्वीकारण्याचे याने कधी मनात आणले नव्हते. आपल्या पहिल्या बायकोने घटस्फोटानंतर दुसरा विवाह केला तर, चरफडत का होईना, तिला समजून घेण्याचा उदारपणा या माणसाच्या ठिकाणी होता; पण या माणसाच्या अभिनेत्री असणाऱ्या प्रेयसीने प्रेमासाठी जसे शांतपणे हालाहल पचवले तसे हालाहल पचविण्याचे सात्त्विक सामर्थ्य याच्यामध्ये नव्हते. या आत्मचरित्रकाराच्या सहवासात माझी 'सत्या'च्या नि 'सौंदर्या'च्या दिशेने वाढ झाली होती. पण 'शिवा'च्या दिशेने वाढ झाली नव्हती. एक उत्कृष्ट, उत्तम साहित्यकृती म्हणून 'एक झाड आणि दोन पक्षी' माझ्या परीक्षेला उतरले होते; पण ती एक 'अत्युत्कृष्ट', 'अत्युत्तम' साहित्यकृती आहे म्हणून माझे मन त्याला उत्स्फूर्त कौल देत नव्हते.

'अत्युत्कृष्ट' साहित्यकृतीने माणसाच्या व्यक्तीत्वाचा सर्वांगीण विकास साधावा, अशी एक अपेक्षा माझ्या मनात रुजलेली आहे. तिचे साहित्यशास्त्रीय किंवा वैचारिक परीक्षण मी केलेले नाही. पण 'स्मृतिचित्रे', 'माझी जन्मठेप', 'सिटॅडेल', 'पण लक्ष्यात कोण घेतो', 'गुड अर्थ', 'ऑथेल्लो' वगैरे साहित्यकृतींनी ती अपेक्षा माझ्या मनात रुजवलेली आहे. ती अपेक्षा अपुरी राहिली म्हणून 'एक झाड...'च्या वाचनानंतर अतृप्तीचा काही अनुभव मला आला होता.

मला वाटते, वाचकाच्या सर्वांगीण मनोविकासाची अट पुरी करावयाची तर अत्युत्कृष्ट आत्मचरित्राने नुसत्या मनोवगाहनावर, व्यक्तिरेखनावर, चित्रणचातुर्यावर किंवा इतर बाह्य गोष्टींवर समाधान मानून चालणार नाही. जे चित्रित व्हावयाचे ते चरित्रही थोर हवे. थोर म्हणजे नैतिकदृष्ट्या अनुकरणीय नव्हे, तर आपल्या विस्ताराने, खोलीने, जटिलतेने, सूक्ष्मतेने, विविधतेने, नि उंचीने वाचकाच्या व्यक्तित्वाला सर्वांगांनी हलविणारे, चौफेर चैतन्य देणारे, दशदिशांनी धुमारे फोडणारे! ■

## साभार स्वीकार

**गुर्जरकथा** : संपा. भीमराव कुलकर्णी; रविराज प्रकाशन; पुणे ३०; १९८५; रु. २५ △ **प्रॉमिस** : सौ. शीला घाटपांडे; स्नेहसुधा कुलकर्णी; नीहार प्रकाशन, पुणे २; १९८५. रु. १६ △ **यही जिंदगी** : मोहन धारिया; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८५. रु. ३० △ **अंतराळातील भस्मासूर** : जयंत नारळीकर; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८५; रु. ३५ △ **बैलं** : अनिल भीमराव पाटील; रणजित प्रकाशन, राजारामपुरी, कोल्हापूर; १९८५; रु. २५.

व. दि. कुलकर्णी

# 'सत्य तूं, सत्य तूं, सत्य तूं, विठ्ठला!'

" ... सत्य तूं, सत्य तूं, सत्य तूं, विठ्ठला,
कां गा हा दाविला जगदाकार?
सांभाळी सांभाळी आपुली हे माया,
आम्हांसी कां भयाभीत केलें?
रूप नाही त्यासी ठेवियलें नाम,
लटकाची श्रम वाढविला,
तुका म्हणे, कां गा जालासी चतुर,
होतासी निष्ठुर, निर्विकार?... "

या अभंगातली तुकाराम महाराजांची भावस्थिती आपणांस पाह्यची आहे. विठ्ठल– एक विठ्ठलच तेवढा– सत्य आहे आणि बाकी सारे असत्य आहे, ह्याची तुकारामांना पक्की जाणीव झालेली आहे. 'सत्य तू', 'सत्य तू', 'सत्य तू' असे त्रिवार त्यांनी विठ्ठलाला ठासून सांगितले आहे. 'त्रिवार सांगणे' म्हणजे निश्चयपूर्वक, निःसंदिग्धपणे, निःशंकपणे सांगणे. तुकारामांच्या मनाला केवळ विठ्ठल, हाच एकमेव सत्य आहे, याची खात्री झालेली आहे. पण केवळ मनाला असे वाटून उपयोग काय? त्याचा प्रत्यक्ष अनुभव यायला हवा. 'केवल' विठ्ठल, डोळ्यांना दिसायला हवा ना? विठ्ठल इंद्रियगोचर व्हायला हवा. पण विठ्ठल स्वतः प्रकटत नाही; स्वतःला तो दर्शवीत नाही. मग तो काय दाखवितो? तर जगदाकार! तुकारामांना हा जगदाकार नको आहे. तो खोटा आहे. त्यामुळे विठ्ठल झाकला जातो; दिसत नाही. विठ्ठल पाह्यला जावे तर दिसतो तो जगदाकार. आपण विठ्ठलाला विनवणी करावी की "विठ्ठला, तू तुझे सत्य रूप दाखव," तर तो ते झाकून ठेवून जगदाकारच पुढे करतो. "विठ्ठला, तू हे असे का करतोस?" म्हणून तुकाराम विस्मयाने, अगतिकतेने विचारतात. "का गा?" या संबोधनात्मक उद्गारात काहीशी जवळीक आहे.

विठ्ठल आणि जगदाकार यांत अभेद आहे, ही आध्यात्मिक अनुभूती येण्याआधीची तुकारामांची ही भावावस्था आहे. जग आणि जगदीश्वर एकच आहेत ही अनुभूती असती तर तुकाराम भयभीत झालेच नसते. आत्मसाक्षात्काराच्या अनुभवानंतरचे तुकारामांचे जग-जगदीश्वर-एकात्मतेचे अभंग केवलानंदाने तुडुंब भरून गेलेले आहेत. त्या अभंगांत मायेला थारा नाही. जिकडे पाहावे तिकडे अवघ्या गगनाचा गाभा त्यांना दिसतो; आणि हा गगनाचा गाभा म्हणजे विटेवरी समपदी उभ्या असलेल्या ह्या विठ्ठलाशिवाय दुसरा तिसरा कोणी नसतो. विठ्ठलच जगदाकार, विश्वाकार म्हणून तुकारामांपुढे प्रकटलेला असतो. जगदाकाराने तो झाकला जात नाही, आणि त्याला पाहण्यासाठी जग बाजूला सारावे लागत नाही. 'विठ्ठला, तू सत्य आहेस आणि जगदाकार मिथ्या आहे,' ही भाषाच मग लटकी ठरते. ती उरतच नाही. 'का गा दाविला जगदाकार?' असा तक्रारीचा सूर तेथे उमटत नाही; उलट जगद्‌विलासात्मक विठ्ठलरूप अनुभवण्यात जीव रमून जातो. साऱ्या ब्रह्मांडात, अणु-रेणूत 'गोविंदु पिकल्या'चा अमृतानुभव येतो आणि 'सत्य भूतीं भगवंत' असा उद्‌गार बाहेर पडतो. तेव्हा 'विठ्ठला, तूच तेवढा सत्य आहेस आणि हा जगदाकार मिथ्या आहे,' ही भावावस्था साधकावस्थेतली आहे; साक्षात्कारानुभवापूर्वीची आहे.

मात्र तुकारामांची साधकावस्थेतली ही प्रारंभिक अवस्था नाही. तुकारामांना मनोमन पटले आहे की, नामरूपात्मक जगाच्या पलिकडे एक निर्गुण-निराकार तत्त्व आहे व तेच विश्वाचे आदितत्त्व आहे. ते आदितत्त्वच तेवढे सत्य आहे, आणि हे नामरूपात्मक जग केवळ लटके आहे. या आदितत्त्वालाच तुकाराम 'विठ्ठल'-रूपात पाहू इच्छितात. पण हे सगुण-साकार जगत् त्या निर्गुणनिराकार विठ्ठलत्वाच्या आड येत आहे, ही तुकारामाची खरी तक्रार आहे. ज्याला रूपही नाही त्याचं एकदम नाव ठेवण्याची उतावीळी करणे म्हणजे अकारण श्रमणे होय. केवळ अकारण नव्हे, तर वांझोटे! 'रूप

नाही त्यासी ठेवियले नाम' म्हणजे वांझेच्या मुलाची नावानिशी काढलेली जणू विवाह-निमंत्रण पत्रिकाच होय! तुकारामाला या नामरूपात्मक जगात गोडी उरलेली नाही. नामरूपात्मक जगताची उभारणी म्हणजे एक लटका उपद्व्याप आहे ही त्यांची ठाम समजूत झालेली आहे.

'लटका श्रम' म्हणजे काय? ज्या श्रमाने नवे काही किंवा अधिक काही निर्माण होत नाही, तेव्हा ते श्रम वाया गेले, असे आपण म्हणतो. कारण येथे कार्य असे काही घडलेलेच नसते, भल्या मोठ्या दगडाला पहार लावून तो उचकटून बाजूला करायचा आहे; पण दिवसभर श्रमूनही तो जागचा तिळभरही जर हालला नसेल तर तेथे कसलेही कार्य झालेले नाही, असेच म्हणावे लागते. तेथे सारे श्रम फुकट गेले. पण हे श्रम लटिके नाहीत. श्रम घेतलेले आहेत; पण त्याचे कार्यरूपात फल मिळालेले नाही. तुकाराम येथे श्रमच लटिके आहेत असे म्हणतात; कारण येथे कार्य घडलेले आहे. नामरूपात्मक जगताची निर्मिती झालेली आहे. पण हे कार्य, ही निर्मिती म्हणजे केवळ भास, मिथ्यारूप आहे, अशी दृढ समजूत झाल्याने तुकाराम या मिथ्यारूपाला आणि त्यामागील निर्मितिशक्तीला–सान्यालाच येथे 'लटिके' 'मिथ्या 'संबोधित आहेत. निर्गुण निराकार सत्य आपल्या जागी शांत, स्वस्थ होते. जगदाकाराचा खोटा आभास निर्माण करण्याचा उद्योग आणि तो अखंड वाढता ठेवण्याचे परिश्रम हे सारे लटके आहे; असे तुकाराम म्हणतात.* 'जगदाकार दाविला' असा शब्दप्रयोग तुकाराम करतात. 'सोंग दाखविणे' ('जादू दाखविणे', तसे 'जगदाकार दाखविणे'.) जे नाही, ते आहे असे दाखविणे! दाखवेगिरी, देखावा करणे! जगदाकार हा देखावा आहे, ही तुकारामांची दृढ समजूत. ती तशी नसती तर 'हे विश्व तू निर्माण केले,' असा कौतुकाचा, कृतज्ञतेचा उद्‌गार त्यांच्या तोंडून आला असता!

*'श्रम' हे नाम संस्कृतमध्ये पुंलिंगी आहे. मराठीतही ते पुलिंगीच आहे; पण त्याचा रूढ मराठीत एकवचनात कधीही वापर केला जात नाही. तुकारामांनी ते एकवचनी वापरलेला आहे. आणखी एक उदाहरण– 'करावे ते काम! उगाच वाढवावा श्रम!' (सरकारी गाथा अभंग १६०५). 'उगाच वाढवावा श्रम' हे वाक्यरूप आपल्या प्रस्तुत अभंगातील वाक्याशी समरूप आहे.

जयापासोनि सकळ, महीमंडळ जालें;
तो एक पंढरीचा राजा, नये अनुमाना श्रुतीसी;

असे जगजेठी विठ्ठलासंबंधी पुढे तुकारामांनी तोंडभरून पुनः पुन्हा म्हटलेले आहे.

पण या अभंगातली अनुभवावस्था ती नाही. माया आणि मायेच्या पराक्रमाने तुकाराम भयभीत झाल्याची ही अवस्था आहे. तुकाराम येथे माया मानतात; एवढेच नव्हे, तर मायेच्या प्रचंड, अनिवार्य, आक्रमक शक्तीने ते अतिशय भ्यालेले आहेत. मायाशक्तीचा वेग-आवेग आणि झपाटा त्यांना असह्य झालेला आहे. मर्त्य मानव ह्या गुण-प्रक्षोभिणीला सावरू-आवरू शकत नाही; थोपवू शकत नाही. मायेच्या महाशक्तीचा पराकोटीचा दाब तुकारामांच्या मनावर आहे. जगदाकार आणि तो निर्माण करणारी माया खोटी आहे, असे वाटले तरी त्यापलिकडे पाहण्याची शक्ती तुकारामांमध्ये अजून आलेली नाही. माया महावेगाने त्यांच्या अंगावर येत आहे आणि भ्यालेले, भेदरून गेलेले तुकाराम विठ्ठलाला विनवीत आहेत, "विठ्ठला, ही तुझी माया तू आवर; आवरून घे!" एखाद्या बंगल्याच्या फाटकातून आत जावे, आणि तिथला कुत्रा एकदम अंगावर धावा आणि आपण त्रेधा-तिरपीट उडालेल्या अवस्थेत, बंगल्याच्या मालकाला ओरडून सांगावे– "अहो, तुमचा कुत्रा आवरा, सांभाळा!", तसे हे आहे. मालक आपल्याला दिसतही नसतो, पण आपण मदतीसाठी त्याला हाका मात्र मारीत असतो.

विठ्ठल सत्य आहे, तो दिसत नाही; पण त्याची मायाविनी शक्ती महापूर आलेल्या एखाद्या महानदीप्रमाणे फुसांडत, गर्जत, तटांवर आदळत येत असलेली मात्र डोळ्यांना दिसत आहे, कानाला ऐकू येत आहे. ज्ञानेंद्रियांवर प्रचंड आघात करीत आहे, हे मात्र तुकारामांना जाणवत आहे. त्यामुळे भयाक्रांत झालेले तुकारामांचे मन 'सांभाळी सांभाळी आपुली हे माया', असे पुनः पुन्हा सांगत आहे. 'भीक नको, पण कुत्रे आवर', ही ती स्थिती आहे. साक्षात्कारानंतर कुत्राही राहिलेला नसतो आणि भीक मागण्यासारखे काही उरलेलेही नसते. 'भयभीत' आणि 'सांभाळी, सांभाळी' या द्विरुक्त शब्दोच्चारातून ऐहिकाच्या भीतीची परमावधी आणि परमेश्वराच्या साहाय्याची तातडी अभिव्यक्त झाली

आहे.* तुकारामांच्या डोळ्यापुढे हे जगडंबर उभे आहे. मायेचे 'भयंकर' रूप आधीच त्यांच्या मनात कोठेतरी पक्केपणाने ठसले, रुजले असले पाहिजे. 'काही पाठ केली संतांची उत्तरे । विश्वासें आदरें करोनिया', हे तुकारामांनीच सांगितले आहे. पुढे गाणाऱ्याचे ध्रुपद त्यांनी धरलेले आहे. ज्ञानेश्वर-नामदेवाची, जनाई-मुक्ताईची वाणी त्यांच्या कानी पडली आहे, मुखी वसली आहे. ज्ञानेश्वरांनी दाखविलेले मायानदीचे अक्राळ-विक्राळ रूप त्यांनी मनोमनी पाहिले असले पाहिजे, मायानदी दुरत्यय आहे, हे त्यांच्याही प्रत्यक्ष अनुभवास आलेले असावे! 'मन स्थिर नाही माझिये हाती। इंद्रिये धावता नावरती' ही प्रमाथी इंद्रियांची त्यांची स्वतःची साक्ष आहे. 'इंद्रियांची गति कुंठेचिना!' ह्या माया-मोहिनीचा हा जगदाकार त्यांच्या आड येत आहे. तुकारामांची सारी तक्रार या मायेविरुद्ध, या नामरूपात्मक जगदाकाराविरुद्ध आहे. हे सारे फोल आहे, लटके आहे, हे कळूनही नित्ये सत्य मात्र त्यांना भेटत नाही. म्हणून महाभयानक माया-मायाविनीचे दर्शन-स्मरणही त्यांना नको आहे.

अर्जुनही भगवान श्रीकृष्णाचे विश्वरूपदर्शन पाहून भ्याला होता. 'भयेन च प्रव्यथितं मनोमे' असे त्याने श्रीकृष्णाला सरळच सांगितले होते. पण तुकारामाच्या आणि अर्जुनाच्या परिस्थितीत मूलतःच, स्वरूपतःच भेद आहे. पहिल्यापासूनच श्रीकृष्ण हा अर्जुनाच्या-बरोबर आहे. श्रीकृष्णाच्या प्रत्यक्ष दर्शनासाठी तुकारामासारखे अर्जुनाने तळमळावे अशी वस्तुस्थितीच नाही. पण 'मानुषी तनू' धारण केलेल्या कृष्णाचे आध्यात्मिक स्वरूप समजायला अर्जुनाला गीता-प्रसंगाची वाट पाहावी लागली. 'विभूतियोगा'अखेर (गीता—अ. १०) अर्जुनाच्या मनावर आलेले मोहाचे आवरण दूर झाले होते; आणि त्याला श्रीकृष्णाच्या परमतत्त्वरूपाचे आणि ऐश्वर-रूपाचे ज्ञान झाले होते, आता त्याला ते ऐश्वर रूप प्रत्यक्ष पाहायचे होते; म्हणून श्रीकृष्णांनी स्वतःच्या विश्वरूपदर्शनाचा सोहळा उभारला (गीता-अ. ११). तुकारामांची परिस्थिती या उलट आहे. त्यांना आधी हा जगदाकारच दिसला व तोच तेवढा दिसत राहिला. 'विठ्ठल' मात्र दिसेना. जगदाकार खोटा आहे व विठ्ठल तेवढा खरा आहे ही तुकारामाची दृढसमजूत. त्यांना भय वाटले ते मायेच्या जगड्व्याळ पसाऱ्याचे; प्रचंड आविष्काराचे!

श्रीकृष्णाने अर्जुनाला आपले विश्वरूपदर्शन जे घडविले ते मुख्यतः दोन रूपांचे आणि अवस्था-कृतींचे. सहस्रसूर्यासारखे दीप्तिमंत आणि दिव्यमाल्यांबरधर-दिव्यगंधानुलिप्त असे आपले सुंदर दर्शन प्रारंभी घडविले. प्रविभक्त जग आपल्या शरीरात एकस्थ झाल्याचे त्यांनी अर्जुनाला दाखविले. गदाचक्र-किरीटधारी कृष्णरूप आसमंतात व्यापून राहिल्याचे अर्जुनाने पाहिले आणि त्याचबरोबर—

त्वमक्षरं परमं वेदितव्यं
त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।
त्वमव्ययः शाश्वत धर्म गोप्ता
सनातनस्त्वं पुरुषो मतो मे ॥

हे त्यास जाणवले व त्यास विस्मयानंद झाला. पण श्रीकृष्णाचे वहुवक्त्र नेत्र, वहुवाहुरुपाद वहूदर, वहु-दंष्ट्राकराल हे दुसरे रूप पाहून मात्र अर्जुन भ्याला. या रूपात आणखी रुद्रता, भयानकता, भीषणता वाढत गेली. विराट पुरुषाच्या दंष्ट्राकराल मुखात धृतराष्ट्रादी कौरव, भीष्म-द्रोणादी आचार्य, अनेक नरलोकवीर, नदीचा प्रवाह प्रचंड वेगाने समुद्रात घुसावा, तसे शिरताना जेव्हा अर्जुनाने पाहिले तेव्हा अर्जुन अतिशय भ्याला. ('भीतभीतः') थरथर कापत हात जोडून तो कृष्णाला पुनः पुन्हा नमस्कार करीत राहिला. अर्जुन श्रीकृष्णाचे अदृष्टपूर्व असे दिव्य आणि परमसुंदर अनंतरूप पाहून जसा आनंदित झाला होता, तसाच तो श्रीकृष्णाचे लोकक्षयोद्युक्त महाकालरूप पाहून भयभीत आणि परमव्याकुळ झाला होता. त्याला श्रीकृष्णाचे पहिले गदाचक्रकिरीटधारी चतुर्भुज असे मानुषीतनूतले सौम्यरूप पाहिल्याशिवाय चैन पडणार नव्हते. तुकारामाला विठ्ठलमूर्तीत हे विराट विश्वरूप अजून

---

* (१) क्रोधाविष्ट झालेल्या श्रीशंकराचा तृतीय नेत्र आता क्षणार्धात उघडणार आणि त्यातून निघणाऱ्या अग्निज्वालेत मदन जळून खाक होणार, हे महा-अरिष्ट पाहताच आकाशस्थ देव, 'क्रोधं प्रभो, संहर संहर' असेच उद्गारले, याची येथे सहज आठवण होते.

(२) सौंदर्याच्या दिव्यरूपाला स्पर्श करावा म्हणून हात पुढे करावा आणि हाताला जड वस्तूच लागावी, हे पाहून भास्करराव तांबे अशाही संदर्भात 'ही माया निज संहरा, हरा!' असेच उद्गारले. ('घटभरा-शिगोशिग')

दिसलेले नव्हते. जे विश्व दिसले दिसत होते ते खोटे, ही त्याची ठाम समजूत झालेली होती ! विठ्ठलच तेवढा सत्य आहे, हे त्याच्या मनाने घेतलेले होते. पण अनुभवास यातले काहीच आलेले नव्हते; उलट मायेचा प्रताप तेवढा जाणवलेला होता.

श्रीकृष्णाचे विश्वरूपदर्शन म्हणजे त्याच्या मायाशक्तीचे दर्शन नसून त्याच्या चिद्रूपाचे ते दर्शन आहे. हे दर्शन जगदुन्मीलनाचे नाही, तसेच निमीलनाचेही नाही. कृष्णरूपात अखिल ब्रह्मांड एकस्थ कसे आहे हे दर्शविणारे, तसेच विश्वातील सर्व शक्तींचा ग्रास करणारे त्याचे महाकालरूप उभे करणारे असे हे दर्शन आहे. या दर्शनाचा हेतू अर्जुनाची युद्धपराङ्मुखता जावी आणि त्याने युद्धसन्मुख व्हावे, हा आहे व तो हेतू पुढे सफलही झालेला आहे. अर्जुन हा मुमुक्षू नाही; तो युयुत्सू राहावा हे येथे त्वरितचे उद्दिष्ट आहे. तुकाराम हे मुमुक्षू आहेत; भक्तिमार्गाचे ते कापडी आहेत; त्यांना ' खरा विठ्ठल ' दिसायला, भेटायला हवा आहे. पुढे खरा विठ्ठल भेटला तेव्हा तुकाराम स्वतःच विठ्ठलरूप झाले आणि तरीही भक्तरूपे उरले. अर्जुनाचे असे काहीही कधीही झाले नाही; ते व्हायचेही नव्हते. सखा म्हणून ' हे कृष्णा ' अशी ज्याला हाक मारावी त्याचे 'घोर' प्रचंड रूप पाहून तो भ्याला होता. कृष्ण पुन्हा ' सखा ' म्हणून नेहमीच्या रूपात प्रकट झाला तेव्हा अर्जुनाची भीती गेली आणि तो आनंदित झाला. (' व्यपेतभीः प्रीतमनाः ') .

तुकाराम स्वतःच विठ्ठलाला शोधीत आहेत. त्यांच्यासाठी स्वतः विठ्ठल काहीही करीत नाही; उलट मायेला त्याच्या अंगावर धाडतो आहे.

" तुजविण तिळभरी रिता ठाव,
नाही ऐसे विश्व बोलतसे;
बोलियले योगी मुनी साधु संत,
आहेसी या आत सर्वां ठायी;
मी तया विश्वासें आलों शरणागत
पूर्वीच अपत्य आहे तुझें.
अनंत ब्रह्मांडें भरोनी उरलासी,
मजला झालासी कोठे नाही ! "

' विठ्ठले आपणांसी उपेक्षिले ' याचे फार मोठे दुःख तुकारामांना झालेले आहे. विठ्ठल आपल्याशी ' ठकाठकी ' करीत आहे, ह्या शंकेने तुकाराम अस्वस्थ झाले आहेत.

पूर्वी भक्त जाले सर्व आपंगिले,
नाही उपेक्षिले तुम्ही कोणी;
माझिया वेळेसि का गा लपलासि,
विश्व पोसितोसि लपोनिया.

विठ्ठलाला असा सरळ रोखठोक प्रश्न त्यांनी विचारला आहे. विठ्ठल कटीवर कर ठेवून, आहे तसा, उभा आहे– निष्ठुर ! निर्गुण !! तो जवळ, म्हणजे अगदी हृदयस्थ असूनही त्याला कळवळा येत नाही.

" ...का रे माझा तुज नये कळवळा,
असोनि जवळी हृदयस्था;
अगा नारायणा, निष्ठुरा, निर्गुणा,
केला शोक नेणा कंठस्फोट... "

आपल्या प्रस्तुत अभंगातही ' होतासी निष्ठुर, निर्विकार ', असे विठ्ठलाला संबोधिले आहेच ! सगुणाला विकार होतात. विठ्ठल मुळात निर्गुण, तेव्हा तो निर्विकार, हे खरे. पण ' निष्ठुरा–निर्गुणा–निर्विकारा ' अशी एकच विशेषणसंहती येते तेव्हा मूळ अर्थ बाधित न होता, त्याचा व्यञ्जनेने ' भावशून्य ', ' भावविरहित ' असा अर्थ होतो. विठ्ठलाच्या मनाला लेशमात्र पाझर फुटत नाही, तो लौकिकार्थानेही निर्गुण आहे, असा अर्थ होतो.

तुकारामांची भाववृत्ती येथे नीट पाहावीशी वाटते. तुकाराम महाराज विठ्ठलापुढे उभे आहेत, आणि त्याला ते त्याच्या काही कृत्यांचा जणू जाब विचारीत आहेत. त्यात किंचित चीड आहे, थोडा राग आहे आणि शेवटी स्पष्ट उपरोध आहे. 'तू स्वतः दर्शन दे ' म्हटले तर मायेला भेटीस पाठवतो; स्वतः निखळ सत्यरूप असून खोटा जगदाकार उभारतो; निर्गुण निराकाराला नामरूपाची उपाधी लावतो–' अशा ह्या विठ्ठलावर रागावयाचे तरी किती, चिडायचे तरी किती? रागावून, संतापून, चिडून झाले. खूप खूप बोलून झाले. अगदी अपशब्दही वापरून झाले. तरीही विठ्ठल हलत नाही की बोलत नाही. तुकारामही आता चिडण्या-संतापण्याऐवजी उपरोध-उपालंभ यांचा वापर करतात. एक मागता, दुसरेच नको ते देणाऱ्या विठ्ठलाला ' का गा जालासी चतुर ? ' असा टोमणा देतात. मनाने तुकाराम या जगदाकाराबाहेर पडले आहेत, मायेपलिकडचे पाहू लागले आहेत, नामरूपात्मक पसाऱ्याचा लटकेपणा त्यांना पुरतेपणी जाणवला आहे. जगदाकाराची, मायेची किंवा नामरूपात्मक पसाऱ्याची ती पहिली भीती, ते

पहिले भय त्यांना आता राहिलेले नाही. विठ्ठलाच्या ठकाठकीची, लवाडीची, चतुराईची त्यांना पक्केपणी जाणीव झाली आहे, आणि म्हणून विठ्ठलाला ते उपालंभाचा नजराणा करू शकतात; काही शाब्दिक अहेर देऊ शकतात. विठ्ठलाचे 'चातुर्य' चव्हाट्यावर आणू शकतात. तुकारामांनी असे अनेक अभंगांतून केलेले आहेच.

या अभंगातील अखेरच्या उपरोधपूर्ण उद्‌गाराची तयारी प्रारंभापासूनच होत आलेली आहे. 'का दाविला?' 'का भयभीत केले?', 'लटिके श्रम का वाढविले?' हे प्रश्न तुकारामांनी काकुळतीने विचारले आहेत, असावेत, असे सकृत् दर्शनी वाटते, पण शेवटचा चरण पाहता,

'तुका म्हणे का गा जालासी चतुर,
होतासी निष्ठुर निर्विकार?'

हे तुकारामाचे उद्‌गार पाहता, हे प्रश्न हळूहळू अखेरच्या ह्या उपरोधाची पूर्वतयारी परिपूर्णतेने करीत असल्याचे जाणवते. सरकारी प्रतीत 'लटकाचि श्रम वाढविला' या ऐवजी 'मिथ्याचि का श्रम वाढविला' असा पाठ आहे. त्याने अर्थविक्षेप होत नाही, हे खरे, पण 'लटकाचि श्रम वाढविला' यातली खोच त्यात येत नाही. सबंध अभंगातील अभिव्यक्ती चढत्या उपरोध-क्रमाने 'का गा जालासी चतुर?' या उपालंभोद्‌गाराकडे जाणारी आहे, तसेच 'निष्ठुरा'च्या ऐवजी 'निसुर' असा पाठ सरकारी प्रतीत आहे. 'निसुर' म्हणजे 'निखालस, निश्चित'. 'तू निखालस निश्चित, निर्विकार का होतोस?' असा मग अर्थ होतो. यात तुकारामाच्या मनातील उपरोधभाव प्रकटत नाही. आणि विठ्ठलाच्या निष्ठुरतेची अभिव्यक्ती होण्याऐवजी अनुल्लेखाने ती दृष्टीआड केली जाते. शिवाय 'निष्ठुर निर्विकार' अशा एकस्थ शब्दयोजनेने विठ्ठलावरील आरोप उत्कटतेने आणि प्रकर्षाने जो प्रतीत होतो तोही आपण गमावून बसतो. अन्यत्रही तुकारामाच्या अभंगात 'निष्ठुर निर्गुण' अशी विशेषणांची जोडी आल्याचे आपण पाहिले आहेच.

'रूप नाही त्यासी ठेवियेले नाम' हा तुकारामांना एक लटका श्रम-उद्योग वाटतो, पण सगुण साकार विठ्ठल हा मात्र लटका श्रम वाटत नाही. हे कसे? आपाततः ही विसंगती वाटते, पण तसे काही नाही. एकतर विठ्ठल म्हणजे विटेवर समपदी उभी असलेली पाषाणाची मूर्ती नव्हे किंवा पंढरीच्या विठ्ठलमूर्तीतच फक्त देव आहे, आणि अन्यत्र तो नाही, अशी नामदेवाची प्रारंभी असलेली समजूतही नव्हे. विठ्ठल हे निर्गुण—निराकाराचे सगुण—साकार रूप आहे. ते मायोद्‌भव नाही; ते भक्तमनोद्‌भव रूप आहे. भक्तीला आणि सगुणोपासनेला अधिष्ठान म्हणून ते उद्‌भवलेले आहे; आणि एक दिव्य शक्तिकेंद्र होऊन राहिलेले आहे. विठ्ठल हे असे चैतन्याचे, परब्रह्माचे 'गुणां आले विटेवरी' असे रूप आहे.

विठ्ठल हे जसे मूर्तिरूपातले परब्रह्म, तसे गुरु हे मानुषरूपातले परब्रह्म. 'गुरुः साक्षात् परब्रह्म!' भक्तिपंथात गुरू आपल्या शिष्याला साक्षात्कार—सौख्य देतो. तुकारामांच्या बाबतीत प्रत्यक्षात ही स्थिती उरली नव्हती. स्वप्नामध्ये बाबाजी चैतन्यांनी 'रामकृष्ण हरी' हा तुकारामांना मंत्र दिला. तुकारामांचा अंगीकार केला. स्वप्नात का होईना पण गुरूने तुकारामांचा अंगीकार केला, पण प्रत्यक्षात हा विठ्ठल मात्र त्यांचा अंगीकार करीत नाही, याचे तुकारामांना दुःख आहे.

माझा देवा तुम्ही केला अंगीकार
हे मज साचार कैसें कळे?

ह्याचे उत्तर तुकारामांना मिळत नाही. हे आता घडवून आणायचे आहे ते विठ्ठलानेच, कारण तोच तुकारामांचा 'देव' आहे, आणि 'गुरू'ही आहे. तुकारामांना विठ्ठल पाहायचा आहे तो गुरूप्रमाणे-चालता, बोलता, हसता, डोलता असा! उदकी घातलेल्या कवित्वाच्या वह्या विठ्ठलाने सांभाळल्या तेव्हाच त्याचा साक्षात्कार तुकारामांना झाला होता. पण तो निराकार विठ्ठलाचा!

पंधरा दिवसांमाजी साक्षात्कार झाला,
विठोबा भेटला निराकार;

पाषाण मूर्तीतल्या विठोबाने आता प्रकट व्हावे आणि आपले रूप दाखवावे, यासाठी तुकाराम झुरत आहेत.

पाहीन श्रीमुख देईन आलिंगन
जीवें निंबलोण उतरीन;
पुसता सांगेन हितगुज मात,
बैसोनि एकांत सुखगोष्टी...

तुकाराम यासाठी तळमळत आहेत. पण गुरुकृपेशिवाय हे घडत नाही; आणि तुकारामांचे गुरू तर स्वप्नात प्रकटले आणि स्वप्नातच अंतर्धान पावले. विठ्ठलानेच आता हे स्वतः होऊन करायला हवे. पण विठ्ठल तर पाषाणाची खोळ घेऊन मुखस्तंभासारखा आपला उभा आहे.

तुकाराम विठ्ठलाशीच असे का भांडतात आणि विठ्ठलही त्याची पराकोटीची कसोटी का पाहतात, त्याचे हे कारण आहे.

ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ यांना गुरू होते. तुकारामांना आपला भक्तीचा सूळ आपल्याच खांद्यावरून वाहून न्यायचा आहे. विठ्ठल सत्य आहे हे तर मनाला पटले आहे आणि प्रत्यक्ष प्रत्ययाला तर येत नाही, अशी विलक्षण भावावस्था आहे ही! अर्जुनाला श्रीकृष्ण परमात्मा भेटला आणि आपल्या विश्वरूप-दर्शनाने त्याने त्याची खात्री पटवली...पण तुकारामांना आवरायला, सावरायला, हात धरून मार्ग दाखवायला कोणी नाही.

ओस झाल्या दिशा मज भिंगुळवाणे,
जीवलग नेणें मज कोणी;

ही तुकारामांची स्थिती आहे. सद्‌गुरू नाही, आणि पांडुरंगही नाही.

तुका म्हणे वाट दावूनि सद्‌गुरु,
राहिला हा दुरू पांडुरंग.

विठ्ठलानेच धीर दिला आणि हात धरून नेले तरच तुकारामांच्या जीवनाचे अमृत होणार! आणि विठ्ठल तर मायेचे भयभीत करणारे खेळ चतुराईने दाखविण्यात आनंद मानीत आहे. पांडुरंगाशिवाय तुकारामांना दुसरी गतीच नाही, आणि तो हा पांडुरंग 'निष्ठुर-निर्विकार' होऊन राहिला आहे. तोच 'सत्य' आहे; पण तोच 'निष्ठुर' झाला आहे, ही तुकारामांची कुंठित भावस्थिती आहे.

तुकारामांना निर्गुण-निराकाराचा रोकडा अनुभव सगुण-साकार विठ्ठल मूर्तीतच जेव्हा आला तेव्हा विठ्ठल हा 'अवघ्या गगनाचा गाभा' म्हणून त्यांना जिकडे तिकडे सरिसा दिसू लागला; तरीही भीमातीरी विटेवरी साजिरे समचरण ठेवून उभ्या असलेल्या विठोबाच्या मूर्तीवर तुकारामांचे डोळे जडून राहिलेच! अवघ्या जगदाकारात विठ्ठल ओतप्रोत भरून तर राहावाच, पण तो दिसावा पंढरीच्या मूर्तीत, ही तर तुकारामांच्या भक्त-जीवनाची आर्त आहे! या अनुभूतीच्या आधीच्या मनोवस्थेतला, पण बराचसा जवळचा 'सत्य तूं सत्य तूं सत्य तूं विठ्ठला' हा अभंग आहे! विठ्ठल हा साक्षात्कारापूर्वी आणि साक्षात्कारानंतरही 'सत्य'च आहे. निर्गुण-निराकार आणि सगुण-साकार अशा दोन्ही रूपांतही तोच 'सत्य' आहे. "जे दिसत आहे, त्यात काय सत्य आहे किंवा त्याचे स्वरूप काय आहे, हे शोधीत असताना प्राचीन ऋषिवर्यांना एक अनाम, विराट, सूक्ष्म, अव्यक्त, निराकार, निरालंब, स्वयं, स्वस्थित, प्राज्ञ असे एकमात्र दर्शन अनुभवास आले. या सर्व गुणांनी परिचयाला येणारे जे, बुद्धीच्या अतीत असलेले परमतत्त्व, तेच 'सत्य', तोच 'ईश्वर' असे पुराण ऋषींनी मांडले. विठ्ठलरूपात हेच तत्त्व संतांनी अनुभवले, भोगले, लुटले. या सत्याची त्रिवार ग्वाही देणारा, पण त्याची प्रत्यक्ष प्रचीती अद्याप न आल्याने, विठ्ठलाला खोचून बोलणारा असा हा प्रगत साधकावस्थेतील तुकारामांचा अभंग आहे.

## साभार स्वीकार

### कादंबरी

**तेरुओ आणि काही दूरपर्यंत** : गौरी देशपांडे; मौज प्रकाशन, मुंबई; १९८५; रु. ३५ △ **अग्निसाक्षी**; धनश्री हळबे; मनोहर ग्रंथमाला प्रकाशन; पुणे; १९८५; रु. २५ △ **तुरुंगातले दिवस** : श्रीपाद जोशी; रविराज प्रकाशन, पुणे ३०; १९८५; रु. ३० △ **डोंगराएवढा** : शिवराम कारंत / सौ. उमा कुलकर्णी, अनु. मेहता पब्लि. हाऊस, पुणे ३०; १९८५; रु. ३० △ **माउली** : आनंद यादव; मेहता पब्लि. हाऊस, पुणे ३०; १९८५; रु. ४० △ **जागर** : पद्माकर गोवईकर; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८५; रु. ३० △ **महापुरुष** : डॉ. मधुकर जावडेकर; सौ. अलका कारले; शैलेंद्र प्रकाशन, पुणे २; १९८५; रु. ३० △ **तो योग खरा हटयोग** : ना. वा. फडके; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. ३५.

रमेश वा. धोंगडे

# मराठी साहित्य, समीक्षा आणि नव्या वाटा

## १

शिक्षक जेव्हा विद्यार्थ्याला सांगतात की 'प्राणवायू ज्वलनास मदत करतो' तेव्हा या वाक्याचा अर्थ कोणी समजावून सांगण्याची गरज नसते. प्रयोगशाळेत प्रत्यक्ष प्रमाणाने हे विधान पटवून देता येते. उलट एखादा मित्र दुसऱ्या मित्राला 'तिला विचारून तर बघ. मग मला सांगायला ये' असे हसत सांगतो तेव्हा ऐकणाऱ्याला या वाक्यांचा अर्थ समजावून घ्यावा लागतो. 'तिने तुला कटवले तर तुझी फजिती होईल. त्याला तुझी गंमत पहायची आहे' 'तू तिला विचारूच नयेस असे त्याने तुला सुचवले आहे', 'तू प्रथम विचारायचे काम कर. ती काहीही म्हणू दे. बाकी सर्व तो सांभाळून घेईल' असे विविध अर्थ परिस्थिती पाहून कोणीही सांगू शकेल. प्राथमिक स्वरूपात समीक्षा येथे सुरू होते. भाषक (वक्ता किंवा लेखक), भोक्ता (श्रोता किंवा वाचक), आणि भाषित (भाषण किंवा लेखन) हे दुवे सहजतेने जोडणे हे समीक्षेचं काम. पहिल्या उदाहरणात समीक्षकाची आवश्यकता नाही; भाषित सिद्ध करण्याची गरज आहे. दुसऱ्या उदाहरणात समीक्षेचा उपयोग होणे शक्य आहे. अर्थात् भोक्त्याला समीक्षेची केव्हाही जरूरी नसण्याची शक्यता नाकारता येणार नाही.

एरवीच्या व्यवहारात आपण समीक्षकाचे स्थान गौण मानतो. त्याला मध्यस्थी, मदतनीस, वकील वगैरे अन्य उपाधींनी संबोधतो. भाषित जेव्हा साहित्य असेल तेव्हा समीक्षक ही उपाधी वापरली जाते. पण याही क्षेत्रात एखाद्या भोक्त्याला समीक्षेची अजिबात आवश्यकता वाटणार नाही हेही रहातेच. उदाहरणार्थ समीक्षक जेव्हा स्वतःच भोक्ता असतो तेव्हा त्याला अन्य समीक्षकांचे साहित्य समजावून घेण्यासाठी जरुरी नसते.

म्हणजे 'अर्थ समजावून देणे' हे साहित्य-समीक्षेचे काम आहे अशी भूमिका आपण येथे घेतो. अर्थ समजावून का सांगावा लागतो? अर्थ समजावून सांगायचा म्हणजे काय करायचे? या प्रश्नांची उत्तरे तीन स्तरावर देता येतील. अपरिचित शब्दांचा अर्थ सांगणे, अपरिचित रचना परिचित रचनांच्या रूपात मांडणे हा भाषिताच्या घटकांचा अर्थ सांगायचा प्रयत्न. ज्ञानेश्वरांची कविता समजावून देताना, मोरोपंतांची आर्या उकलून दाखवताना हे प्रयत्न करावे लागतात.

ज्याच्या असे विमलही मणि उत्तमांगी
तो सर्प काय न डसे खल अंतरंगी?

या वामनपंडितांच्या पंक्तीतील विमल, मणि, उत्तमांग, खल यांचे अर्थ आधुनिक मराठी वाचकाला सांगावे लागतील.

अशा तऱ्हेचा अर्थ समजावून सांगण्याच्या प्रयत्नाला आपण शब्दार्थ-अन्वय-लक्ष्यी समीक्षा असे म्हणू.

अर्थ समजाविण्याची दुसरी पायरी म्हणजे साहित्यकृतीचे जे एक जग असते त्याच्याशी तिचा संबध जोडणे. त्या जगाच्या संदर्भातच साहित्यकृतीचा अर्थ कळतो. वरीचशी समीक्षा ही या प्रकारची असते. शब्दार्थ–अन्वय-लक्ष्यी समीक्षेत वाङ्मयीन विद्वत्ता लागते तर या स्तरावर रसिकता लागते. उदाहरणार्थ-

मी कवितेचा दास मला
कवि बोलती जगातला
परि न झरे माझ्या गानी
दिव्यांची असली श्रेणी
जडतेला खिळुनी राही
हृदयबंध उकलत नाही

यातील आर्तता केवळ शब्दांच्या मुख्यार्थाने जाणवणार नाही. संस्कृत साहित्यविचारात व्यंग्यार्थ किंवा ध्वनी यांची चर्चा करताना हे 'जाणवणारे' अर्थ

लक्षात घेतात. बालकवींच्या मनातील सृजनतेविषयीची हळहळ निर्झरास पाहून कशी व्यक्त होते, ती तशी व्यक्त का होते, या हळहळीचे स्वरूप काय या प्रश्नांची चर्चा समीक्षक या स्तरावर करेल. ही समीक्षा साहित्यकृतीने निर्माण केलेल्या जगाचा वेध घेते. त्यातून आस्वादनास मदत होते. याला आपण आस्वादन-लक्ष्यी समीक्षा म्हणू.

अर्थ सांगणाऱ्या समीक्षेचे हे दोन स्तर ओलांडले की तिसरा स्तर येतो तो साहित्यकृतीचे प्रत्यक्ष जीवनाशी नाते जोडण्याऱ्या प्रयत्नाचा. ज्ञानेश्वरीतील अध्यात्म-विचार आणि भक्तिसंप्रदाय, गडकऱ्यांच्या नाटकातील सामाजिक प्रश्न आणि गडकऱ्यांनी त्यांची केलेली सोडवणूक, 'बलुतं' आणि महाराष्ट्रातील दलितांचे जीवन यातील संबंध तपासणारी समीक्षा ही या तिसऱ्या स्तरावरची. या समीक्षेला आपण जीवन-लक्ष्यी समीक्षा म्हणू. लेखकाचा जीवनविषयक दृष्टिकोन, तत्कालीन सामाजिक, सांस्कृतिक परिस्थिती, तिचे लेखनातून दिसणारे परिणाम, तत्कालीन समाजाची नीतिमूल्ये या गोष्टींची चर्चा या समीक्षेत येते.

## २

अर्थ समजाविणे हे समीक्षेचे एक कार्य झाले. हे कार्य करताना समीक्षक अनेकदा स्वतःची मते, स्वतःची आवड-निवड, स्वतःचा जीवनविषयक दृष्टिकोन, स्वतःची साहित्याविषयीची सैद्धान्तिक भूमिका कळत-नकळत व्यक्त करीत असतो. तसे घडणे अपरिहार्य असते. तसे न घडण्यात दोन धोके संभवतात. एक, यांत्रिकपणाने समीक्षक साहित्यकृतीचे मूल्यमापन करतो. उदाहरणार्थ-

जगी सर्व सूखी असा कोण आहे ?

यामधे 'सुखी' मधील सु दीर्घ केला तर लेखन बिघडते; उलट सु ऱ्हस्व लिहिला तर वृत्त चुकते हे तो बरोबर दाखवतो. कारण भुजंगप्रयातमधे अक्षरे कशी असावीत हा नियम त्याला ठाऊक असतो. दुसरा धोका साहित्यकृतीला मनमोकळेपणाने सामोरे न गेल्याने तिच्या परिणामास मुकण्याचा. समीक्षकाने 'स्व'ची फाजील जाणीव ठेवून समीक्षा केली तर तो केवळ मूल्यमापन करून थांबतो. म्हणजे समीक्षकाची साहित्यकृतीकडे पाहण्याची कमालीची तटस्थता आणि साहित्यकृतीच्या चर्चेद्वारे 'स्व'चे अस्तित्व जाणवून देण्याची कमालाची उत्सुकता या दोहोंचा परिणाम अखेर एकच होतो. समीक्षा अर्थ समजाविण्याचे कार्य थांबवून फक्त मूल्यमापन करते. मराठीत याला 'टीका करणे' असे म्हणतात. मराठीतील बरीचशी समीक्षा या दर्जाची होती आणि आजही आहे. संस्कृत 'टीके'चा मराठी 'टीका' अवतार हा अर्थ समजा-विण्याकडून केवळ मूल्यमापनाकडचा प्रवास आहे.

## ३

आपण अर्थ समजाविणाऱ्या समीक्षेचे तीन स्तर पाहिले. समीक्षेच्या दोन प्रयोजनांची दखल घेतली. यानंतरचा समीक्षेचा विचार करण्यापूर्वी समीक्षकाची साहित्याबाबतची धारणा काय असते याचा विचार करावा लागेल.

साहित्य आपल्याला काय देते ? या प्रश्नाबाबत तीन प्रमुख भूमिका संभवतात.

एक, साहित्य आपल्याला जीवनविषयक दृष्टिकोन देते. ते आपल्याला जीवनमूल्ये देते. या भूमिकेत परत दोन टोकाची मते आहेत. यातले एक टोक असे की साहित्य हे त्रिकालाबाधित सत्य सांगते. दुसरे टोक असे की साहित्य आपण कसे वागावे ते शिकवते. यातूनच मग साहित्याचे पूज्य ग्रंथात किंवा प्रचारकी वाङ्मयात रूपांतर होते. साहित्याकडून जीवनविषयक दृष्टिकोनाची अपेक्षा करणाऱ्या समीक्षकाने हे दोन्ही धोके ओळखायला हवेत. ज्ञानेश्वरीचा त्याने केवळ तत्त्वज्ञानावरचा महान् ग्रंथ असा उल्लेख करून गप्प बसू नये. तसेच केवळ आंबेडकर आणि फुले यांची तत्त्वे एखादी साहित्यकृती मांडते म्हणून ती थोर अशाही भ्रमात राहू नये.

दोन, साहित्य आपणास आनंद देते. या आनंदाच्या स्वरूपाचे वर्णन ॲरिस्टॉटलपासून ते एलियटपर्यंत आणि भामहपासून ते अभिनवगुप्तापर्यंत सर्वांनी करण्याचा प्रयत्न केला आहे. या भूमिकेतही दोन टोकाची मते दिसतात. एका मतानुसार साहित्याचा आनंद हा त्या त्या व्यक्तीपुरता असतो; व्यक्तीच्या आस्वादनक्षमतेवर तो अवलंबून असतो. आनंद हा व्यक्तिकेंद्री बनला की 'कलेसाठी कला' ही भूमिका रास्त वाटू लागते. दुसरे मत असे की आनंद म्हणजे करमणूक. म्हणून करमणूक करणे हे साहित्याचे प्रयोजन. लोकप्रिय साहित्याला ही भूमिका सोयीची असते. आनंदवादी समीक्षकाने या

दोन्ही टोकाच्या मतातील धोके लक्षात घ्यावयास हवेत.

तीन, साहित्य आपल्याला काहीच देत नाही. किंबहुना साहित्याने काही द्यावे ही अपेक्षाच रास्त नाही. साहित्यकृती फक्त असते. तिचे असणे हेच महत्त्वाचे. ती काय देते हा प्रश्न फार उपयुक्ततावादी आहे. म्हटले तर साहित्य काहीही देते; काहीही देऊ शकते. महाभारतावर आधारलेल्या भारतीय भाषातील वेगवेगळ्या साहित्यकृती हे महाभारत काय वेगवेगळं (आणि कधी भलभलतं) देऊ शकतं याचं द्योतक आहे. ही भूमिका टवाळीने नाकारणे सोपे आहे. उदाहरणार्थ, यातून साहित्याचे असणे म्हणजे छापील पाने असणे असा तर्क काढता येईल. पण ही भूमिका साहित्याला वेठीला धरू पहाण्यास विरोध करते. साहित्याकडे विशिष्ट अपेक्षेने पहाणाऱ्या सर्वच दृष्टिकोनांबाबत ती सावधानतेचा इशारा देते. आय. ए. रिचर्डस् ही भूमिका घेताना साहित्य फक्त आपल्या नैसर्गिक प्रेरणात सुसंवाद आणते एवढे म्हणून मोकळे होतात. ही भूमिका घेणारा समीक्षक साहित्यकृतीकडे अधिक वस्तुनिष्ठतेने पाहू शकतो. हिला आपण वस्तुनिष्ठवादी समीक्षा असे म्हणू. ('अस्तित्ववादी' या शब्दाला तत्त्वज्ञानाचा एक पंथ आधीच बिलगला आहे म्हणून.)

४

आनंदवादी समीक्षक आस्वादन-लक्ष्यी समीक्षा लिहिण्याची जास्त शक्यता आहे तर जीवनवादी समीक्षक जीवन-लक्ष्यी समीक्षा लिहिण्याची जास्त शक्यता आहे. आस्वादन-लक्ष्यी समीक्षा साहित्यकृतीचा आंतरिक अभ्यास करते. जीवनवादी आणि वस्तुनिष्ठतावादी समीक्षक साहित्यकृतीच्या अंतरंगाबरोबरच तिच्या बाह्य संबंधांचा, तिच्या स्थानाचा वेगवेगळ्या बाजूंनी अभ्यास करतो. मात्र हे कायम स्वरूपाचे कप्पे नाहीत; त्यांच्यात सरमिसळ होऊ शकते. समीक्षेच्या या त्रिविध प्रयत्नात आणि साहित्याच्या या त्रिविध प्रयोजनात दोन महत्त्वाची गृहिते आहेत. साहित्याला सामाजिक आणि सांस्कृतिक प्रतिष्ठा असते आणि समीक्षेची सुरुवात साहित्यकृतीपासून होते. ब्रिटनची समीक्षा-परंपरा ही साहित्यकृतीकडून सिद्धान्ताकडे जाणारी परंपरा आहे. प्रत्यक्षानुभवाकडून ज्ञानाकडे जाणारी न्यूटनची वैज्ञानिक पद्धती ही ब्रिटनच्या वैचारिक परंपरेचा भाग होती. ब्रिटनमधील भाषावैज्ञानिक, समाजशास्त्रज्ञ, साहित्य-समीक्षक याच परंपरेतले. मराठीत जी समीक्षा इंग्रजी अमदानीच्या काळात पाश्चात्त्य समीक्षा म्हणून पुढे आली ती समीक्षा मूलतः या स्वरूपाची होती. संस्कृत काव्यशास्त्राच्या दंडकांनी मराठी साहित्य तपासण्याऐवजी ते साहित्यच प्रत्यक्षरीत्या काय सांगते यावर या समीक्षेचा भर होता.

मात्र ब्रिटनमध्ये दुसऱ्या महायुद्धानंतर जी उलथापालथ होऊन साहित्याचे सामाजिक स्थान आणि प्रतिष्ठा यांचे अवमूलन झाले त्याची सुरुवात मराठी साहित्याच्या बाबतीत आता होण्याची चिन्हे दिसू लागली आहेत. १९५७ मधील आवरबाखचा 'मायमेसिस' हा ग्रंथ या दृष्टीने खूप बोलका आहे. होमरपासून ते व्हर्जिनिया वुल्फपर्यंतच्या साहित्याचा आढावा घेताना आधुनिक साहित्यात संस्कृतिबाबत द्वेष आढळतो असे तो म्हणतो. आधुनिक संस्कृतीत साहित्याचे स्थान दुय्यम दर्जाचे आहे. विविध मूल्यांच्या आणि कमी मूल्यांच्या या काळात साहित्याने समाजधारणा होईल हे स्वप्न बाळगणे वेडेपणाचे आहे. मराठी साहित्य हे समाजाच्या अग्रभागी अपवादानेच होते. संत साहित्याने मराठी संस्कृतीला जीवनाची मूल्ये दिली, पण ती अध्यात्माच्या वाटेने. टिळक—आगरकरांचे लेखन हे वैचारिक वाङ्मय आहे; ललित साहित्य नाही. फडके-खांडेकर हे समाजाच्या वैचारिक प्रगतीचे नेते नव्हते. मराठी संस्कृतीत संतांचा अपवाद वगळता कवि—लेखक मंडळी समाजाचे वैचारिक नेतृत्व करणारी कधीच नव्हती. पण १९०० ते १९६० पर्यंत साहित्याला सामाजिक प्रतिष्ठा होती. साहित्याचा कर्ता आणि भोक्ता सुशिक्षित मध्यमवर्ग होता. या वर्तुळात साहित्याचे आणि साहित्यिकाचे भरपूर लाड झाले. १९५७ मधील आवरबाखला वाटणारी खंत आज मराठी साहित्याबाबत वाटू शकते. उदाहरणार्थ— 'आम्ही देशाचे मारेकरी', 'महापूर', 'पौगंड' यातील प्रस्थापित मूल्यांबाबतचा द्वेष स्पष्ट आहे. संतांचा अध्यात्मवाद, राजकीय चळवळीतून पुढे आलेला हिंदुत्ववाद आणि गांधीवाद, राजकारणातून पुढे आलेला समाजवाद यात अनुस्यूत असणारी सर्वच मूल्ये आपण आज बाजूला टेवली आहेत. सामाजिक जीवनातील नीतीचा ऱ्हास हे त्याचेच लक्षण आहे. जीवनाचे वेगवेगळे कप्पे करून आपण जगतो. त्यामुळे मूल्यांची विविधता वाढली पण एकसंधपणा गेला. घरात प्रामाणिकपणा शिकविणारा व्यापारी व्यापारात व्यवहाराच्या नावाखाली लबाडी करतो, ज्ञानदानाने मनावर संस्कार घडवून मनाचा

मोठेपणा शिकविणारा शिक्षक परीक्षा, सहकाऱ्यांशी वर्तन यात मनाचा कोतेपणा दाखवतो. यात उद्ध्वस्त होत आहेत ती मूल्ये याचे आपणास भान नाही; भान ठेवण्याची जरूरीही नाही. अशा वेळी साहित्य सांस्कृतिक एकतेची शक्ती देईल ही अपेक्षा करणे फोल आहे.

मराठी साहित्याला आणि समीक्षेला प्रवाहाच्या विरुद्ध वाहता येणार नाही. इंग्रजी अमदानीपासूनच मराठी साहित्य विशिष्ट वर्गाची गरज भागवू लागले. साहित्य ही मुळात भाषिक कला आहे. आजच्या काळात भाषिक कलेचे महत्त्व पूर्वी इतके राहिलेले नाही, राहाणार नाही. नाटक हे साहित्य होते; आजही आहे. पण जसजसे आपण नाटक ही प्रामुख्याने प्रयोगजीवी कला आहे असे मानू आणि ते तसे करण्याचा प्रयत्न करू तसतसे नाटकातील साहित्याला—नाटकातील भाषिक कलेला—आपण गौणत्व प्राप्त करून देऊ. पाश्चात्त्य संस्कृतीत हे घडले आहे. मराठी संस्कृतीत हे घडण्याची भीती आहे. 'घाशीराम कोतवाल'चे पाठ्य साहित्याच्या दृष्टीने ढिसूळ आहे पण त्याचा प्रयोग सुंदर आहे हे समाधान ज्या क्षणी आपण मानतो त्या क्षणी नाटकातील भाषिक कलेला आपण गौणत्व देतो. चित्रपट, दूरदर्शन या माध्यमातील दृक्-संवेदनांना आवाहन करण्याची ताकद त्यातील श्राव्य-संवेदनांना कधी बाजूला टाकेल हे सांगता येणार नाही. भाषिक कला आणि तिचे आकर्षण क्षीण होण्याचा आणखी एक भरभक्कम पुरावा म्हणजे मराठी संस्कृतीत आज निस्तेज होऊ पहाणारी वक्तृत्वकला. कथाकथनाच्या कार्यक्रमाला अजून गर्दी होते ही समाधानाची बाब असली तरी सार्वजनिक ठिकाणी लाखो श्रोत्यांना केवळ वक्तृत्वाच्या सामर्थ्यावर खिळवून ठेवणारे वक्ते आज मराठीत नाहीत.

मराठी समीक्षा ही विद्यापीठांपुरती मर्यादित होऊ पहात आहे. केवळ समीक्षेला वाहिलेली मासिके बंद पडत आहेत. यातून साहित्य आणि समीक्षा यांचे सांस्कृतिक क्षेत्र आणि महत्त्व आणखीनच कमी होणार आहे. या परिस्थितीत समीक्षेत पूर्वापार चालत आलेली पद्धत वापरणे हे आणखी दुर्भाग्याचे ठरणार आहे. समीक्षेला नवीन काय करता येईल ?

५

टी. एस. एलियटच्या मते सर्व समाजाच्या मनाचे प्रतिबिंब ज्यात पडते ते काव्य. तसे होत नसेल तर समीक्षेने पुढे यावे आणि काव्याला—साहित्याला तसे करायला लावावे.

एलिएटची समीक्षा ही साहित्यिकाची समीक्षा होती. स्वतःच्या लेखनाची ती पूर्वतयारी होती. एलियटने समीक्षेच्या द्वारे स्वतःच्या काव्याचा अर्थ समजू शकणारा रसिकवर्ग निर्माण केला. एलियटच्या आधी वर्ड्स्वर्थ आणि कोलरिज यांनी तेच केले. मराठीत एक मर्ढेकरांचा अपवाद वगळता साहित्यिकांनी असे प्रयत्न केल्याचे दिसत नाही. (येथे स्वतःच्या साहित्याचे समर्थन ती साहित्यिकाची समीक्षा असा अर्थ नाही हे लक्षात घ्यावे.) सध्या तरी अशा साहित्यिक-समीक्षकाची वाट पाहणे एवढेच आपल्या हातात आहे.

मराठी साहित्याचे आणि पर्यायाने समीक्षेचे सांस्कृतिक स्थान ठरविणे आपल्या हातात नाही. पण विद्यापीठांच्या बंदिस्त क्षेत्रात का होईना त्याविषयी नवे प्रयत्न करणे शक्य आहे आणि आवश्यकही आहे.

मागे उल्लेख केलेली आस्वादन-लक्ष्यी समीक्षा मराठीत आहे. पण तेथे थांबून भागणार नाही. समीक्षा जेव्हा फक्त व्यक्तिगत प्रत्ययाची दखल घेते आणि वर्णनात्मक पद्धतीवर संपूर्ण भिस्त ठेवते तेव्हा साहित्यातील चर्चा करावयाचे प्रश्नच संपुष्टात येण्याची शक्यता असते. कारण कालांतराने तेच तेच प्रश्न विचारले जातात आणि त्यांची तीच तीच संभाव्य उत्तरे असतात. विद्यापीठीय अध्यापनात 'रसग्रहण' नावाचा प्रकार या पद्धतीचा असतो. 'अमुक एका समीक्षकाने अमुक एका साहित्यकृतीवर लिहिल्यामुळे आता तीवर नव्याने लिहिण्यासारखे काही उरलेच नाही', 'माझी अमुक एका कृतीवरील समीक्षा ही अंतिम समीक्षा आहे' अशा तऱ्हेच्या विधानात अल्पसंतुष्टता आहे आणि आंधळेपणाही.

भाषाविज्ञान, चिह्नविज्ञान, समाजविज्ञान, मानववंशविज्ञान, तत्त्वज्ञान, इतिहास, मनोविज्ञान, अशा सामाजिकविज्ञानांच्या अनेक शाखात ज्ञानाची नवनवीन भर पडत असते. मानवी संस्कृतीच्या आणि वर्तनाच्या विविध अंगांचा ही विज्ञाने विचार करत असतात. साहित्य हे मानवी संस्कृति आणि मानवी वर्तन यांचा उत्कृष्ट आविष्कार असते. त्यामुळे साहित्यविषयक विचारात, म्हणजेच समीक्षेत या विज्ञानांचा आधार घेणे केवळ शक्य नव्हे तर जरुरीचे आहे. मराठी समीक्षा या दृष्टीने कोणत्या नव्या वाटा शोधू शकेल याचा आता विचार करू.

६

साहित्यिक हा लेखन करताना कोणत्यातरी साहित्यप्रकाराचा आधार घेतो. तो नाटक लिहितो किंवा कादंबरी लिहितो किंवा कविता. या प्रकारांना आपण आविष्कारजाती म्हणू.

आविष्कारजातींच्या आधारे साहित्य-समीक्षा करणे नवीन नसले तरी दुर्मिळ आहे. ग्रीक साहित्य-विचारात आविष्कारजाती आणि ज्यांच्या विषयीचे साहित्य त्या लोकांचा वर्ग यात समीकरण घालण्याचा प्रयत्न होता. म्हणजे शोकनाट्य आणि महाकाव्य हे राजे किंवा सरदार घराण्यांसाठी; आनंदपर्यवसायी नाटक हे मध्यमवर्गासाठी; तर उपहास, फार्स हे सामान्य लोकांसाठी. ग्रीकांच्या या दृष्टिकोणात फक्त एक आग्रह होता की साहित्यनिर्मितीबाबतचे काही भाकीत होते हे आज समीक्षेला तपासता येईल. आजही आपण अमूक एक विषय नाटकाला चांगला की कादंबरीला याची चर्चा करतो 'गारंबीचा बापू' नाटकापेक्षा कादंबरी चांगली वाटते याचे कारण रूपान्तरण प्रक्रियेत शोधायचे की विषयात— आणि म्हणून आविष्कारजातीत ?

मराठीतील महाकाव्ये ही संस्कृत महाकाव्याची भाषांतरे किंवा रूपांतरे होती. मराठीला स्वतःचे असे टिकून राहिलेले महाकाव्य नाही. येथे 'टिकून राहणे' हा गुण महत्त्वाचा आहे. अभिजात साहित्याची ती कसोटी आहे. कालाच्या प्रवाहात जे टिकून राहते ते साहित्य अशी साहित्याची साधी व्याख्या भाषावैज्ञानिकही करतात. 'एकच प्याला' हे टिकून राहिलेले शोकनाट्य आहे असे समजले तर काय दिसते? सुधाकर राजाही नव्हे की सरदारही नव्हे. पण ग्रीकांची व्याख्या ही कालानुसार बदलून घ्यायला हवी. शोकनाट्याचा नायक हा आतर्क सामाजिकदृष्ट्या कोणत्याही वर्गाचा असला तरी मनाने उच्च प्रतीचा असावा लागतो. एका उत्तुंग व्यक्तिमत्त्वाचे स्वजनांपासून दुरावण्यात, एकटे पडण्यात शोकनाट्याचा शोक असतो. मात्र आनंदपर्यवसायी नाटक मध्यमवर्गाचे असते हा ग्रीकांचा आग्रह फक्त ग्रीक नाटकांच्या बाबतीत खरा होता. फार्सबाबतचे त्यांचे विचार नव्या संदर्भात समजावून घ्यावे लागतील. फार्स-मधील पात्रे व्यावहारिक आणि सांपत्तिकदृष्ट्या कोणत्याही वर्गाची असली तरी फार्समध्ये ती सामान्य माणसांप्रमाणे वागतात. फार्स हा व्यक्तीने कळत-नकळत घेतलेले प्रतिष्ठेचे बुरखे हसत-खेळत ओढून काढण्याचा प्रकार आहे. यातून उघडे पडते ते माणसाचे सर्वसामान्य दर्शन. शोकनाट्यात माणसाच्या मनाची उत्तुंगता आणि तिच्या-तून देणारी कणव असते तर फार्समध्ये मनाचे सामान्यत्व आणि त्यातून निपजणारा विनोद असतो. ग्रीकांची विषयासंबंधीची सामाजिक दर्जाची वर्गवारी अशी मनाच्या प्रतीच्या वर्गवारीशी जोडावी लागेल. ग्रीकांनी महाकाव्याचा विचार केला असला तरी कवितेचा विचार त्यात बसत नाही हे लक्षात घेण्यासारखे आहे.

आविष्कारजातीचे दुसरे एक वर्गीकरण प्रमुख तीन जाती मानते: नाट्य—यात कृती महत्त्वाची असते; कविता— यात गेयता महत्त्वाची असते; निवेदन— यात भाषण महत्त्वाचे असते. नाटक, कविता, कादंबरी या आविष्कारजातींचा या अनुरोधाने विचार करता येईल.

७

साहित्याचा तौलनिक अभ्यास ही समीक्षेला मिळा-लेली नवी वाट आहे. तौलनिक अभ्यासाने समीक्षेची नवीन पद्धती शोधून काढली नसली तरी साहित्याबाबत काही नवीन प्रश्न विचारले आहेत.

तौलनिक अभ्यास म्हणजे जगातील विविध साहित्या-तील सर्वश्रेष्ठ कलाकृतींचा अभ्यास नव्हे. शाकुंतल, हॅम्लेट, इलियड यांची इंग्रजी किंवा मराठी भाषांतरे वाचून तौलनिक अभ्यास होत नसतो. थोरांच्या गोष्टी वाचून इतिहासाचा अभ्यास होत नसतो. तसे तौलनिक अभ्यास म्हणजे दोन संस्कृतींची तुलना करून त्यात दुवे शोधणे; पाच-सहा विभिन्न भाषांतील साहित्याची भाषां-तरे गोळा करणे नव्हे. म्हणजे ज्या दोन साहित्यांची तुलना करायची त्या दोन भाषा समीक्षकाला येणे आवश्यक आहे. अन्यथा आगरकरांच्या 'विकार-विलसित'शी खाडिलकरांच्या 'सवाई माधवराव यांचा मृत्यू'ची तुलना करून खाडिलकर शेक्सपिअरपेक्षा श्रेष्ठ ठरवावे लागतील. तौलनिक अभ्यासाने आंतर-राष्ट्रीय किंवा आंतरप्रांतीय सामंजस्य आणि बंधुभाव वाढतो हा आशावाद सांस्कृतिक मंत्रालयाने धरावा; तौलनिक अभ्यासकाने त्यापासून दूर रहाणेच योग्य. तौलनिक अभ्यास म्हणजे समवयस्क लेखकांच्या साहित्य-कृतींची तुलनाही नाही. स्वातंत्र्यलढ्याच्या अनुषंगाने दोन समकालीन कन्नड आणि मराठी साहित्यिकांची तुलना फलदायी ठरेल; कारण स्वातंत्र्यलढा ही समान

सांस्कृतिक पार्श्वभूमी त्यांना आहे. पण त्यांची तुलना हिटलरच्या आमदानीत काढलेल्या एखाद्या जर्मन साहित्यिकाशी करणे योग्य नाही. जन्मतारखांची जवळीक हे काही तुलनेचे कारण ठरू शकत नाही. उलट इलियड आणि महाभारत यांच्या कर्त्यांच्या जन्मतारखा उपलब्ध नसल्या, त्यांचे काल ठरविणे अवघड असले तरी विषय आणि आविष्कारजाती यातील साम्याच्या आधारावर त्यांची तौलनिक समीक्षा करणे फलदायी ठरेल. तौलनिक अभ्यास हा साहित्याच्या बाहेर जाऊ लागला, इतर ऐतिहासिक साधने न वापरता केवळ साहित्याच्या आधारावर इतिहास आणि संस्कृती यावर भाष्य करू लागला तर त्यातून त्या समाजाबाबत विपर्यस्त निष्कर्ष काढण्याचा धोका संभवतो. हा धोका अधिक मोठा आणि अधिक हानिकारक आहे. समजा स्वातंत्र्य-लढ्याच्या काळात एखाद्या प्रसिद्ध मराठी कवीने प्रेमगीते लिहिली असली आणि त्यांच्या समकालीन अशा एखाद्या प्रसिद्ध बंगाली कवीने क्रान्तिगीते लिहिली असली तर त्यावरून मराठी समाज हा पलायनवादी होता असे म्हणणे धाडसाचे ठरेल.

तौलनिक अभ्यास म्हणजे काय नाही आणि त्यातील धोके यांची नोंद घेतल्यानंतर आता त्याचे महत्त्व आणि त्याचा उपयोग याकडे वळू.

तौलनिक अभ्यासाने साहित्याविषयीची, विशिष्ट आविष्कार जातिविषयीची समज वाढते. फक्त मराठी साहित्याचा अभ्यास करणाऱ्याला शोकनाट्याचे खरे स्वरूप, त्याची व्याप्ती समजणे अवघड आहे. फक्त मराठी साहित्य अभ्यासणाऱ्याला अस्तित्ववादी प्रवृत्तींचे दर्शन न घडण्याची शक्यता आहे.

विविध साहित्यांच्या अभ्यासाने आणि तुलनेनेच साहित्यात पुन्हा पुन्हा कोणत्या प्रवृत्ती येतात, कोणत्या रूपात त्या पुन्हापुन्हा दिसतात हे शोधता येईल. तौलनिक समीक्षेचे ते प्रमुख उद्दिष्ट असते. अभिजातवाद (Classicism) आणि त्यानंतर येणारा स्वैरवाद (romanticism) यांचे परस्पर नाते, त्यातील कार्यकारणभाव या गोष्टी मराठी समीक्षकाला नीट समजण्यासाठी इंग्रजी साहित्याचा अभ्यास निश्चितच उपयोगी पडेल. ग्रीकांचा नैराश्यवाद, युद्धकाळातील इंग्रजी कविता, आणि अलिकडचा फ्रेंच अस्तित्ववाद यांची तुलना मानवी मनाच्या काही मूलभूत प्रवृत्तींवर प्रकाश टाकेल.

तौलनिक समीक्षेचा तिसरा फायदा म्हणजे एका साहित्यिकावर घडणाऱ्या इतर साहित्यिकांच्या साहित्यकृतींच्या परिणामांची दखल घेता येणे. बोरकरांच्या कवितेचा पाडगावकरांच्या कवितेवरील परिणाम, कोल्हटकरांच्या नाटकांचा गडकऱ्यांच्या नाटकांवरील परिणाम हे मराठी साहित्याच्या क्षेत्रात राहूनही अभ्यासता येतील. पण तेंडुलकरांच्या नाटकांवरील टेनिसी विल्यम्सचा परिणाम, बालकवींच्या कवितेवरील शेली-कीटसचा परिणाम, किंवा व्यंकटेश माडगूळकरांच्या 'सत्तांतर'वरील सारा हार्डी यांच्या 'लंगूर्स ऑफ अबू'चा परिणाम तौलनिक समीक्षाच योग्य रीतीने शोधू शकेल. एखादी साहित्यकृती ही वाङ्मयचौर्याचे उदाहरण आहे, तीवर फक्त बाहेरच्या शैलीचा परिणाम आहे, की तिचा विषय बाहेरचे साहित्य वाचून स्फुरलेला आहे, चोरी–परिणाम–आधार यातील सीमारेषा कशा ठरवायच्या, लेखकाची परभाषीय साहित्य समजण्याची क्षमता काय लायकीची आहे इत्यादी प्रश्न विचारणे आणि त्यांची उत्तरे देणे ते तौलनिक समीक्षाच करू शकते.

तौलनिक समीक्षेत विषय आणि आविष्कार यांची एका भाषेतील रूपे दुसऱ्या भाषेत कशी बदलतात याचा विचार होतो. तौलनिक समीक्षा ही अंतिमतः कवि-कल्पनांचा इतिहास असतो. तौलनिक अभ्यास भाषांतराचेही योग्य मूल्यमापन करू शकतो. दोन समाजांच्या कलांचा परस्परावरील परिणामही या अभ्यासाने शोधता येतो. उदाहरणार्थ इंग्रजी ऑपेराचे मराठी संगीत नाटकातील रूपांतर, लॉरेल-हार्डी चित्रपटाचे बेकेटच्या 'गोदो'वरील संस्करण, तमाशाचे मराठी नाटकावरील परिणाम यांचा विचार तौलनिक अभ्यासाविना होणार नाही.

८

साहित्याची सांस्कृतिक समीक्षा ही इतिहास, समाज-विज्ञान, मानववंशविज्ञान यातून प्रेरणा घेणारी समीक्षा आहे.

साहित्याचा विचार प्रथम साहित्य म्हणून झाला पाहिजे. आस्वादन-लक्ष्यी समीक्षा आणि आनंदवादी समीक्षक यावर भर देतात. साहित्याचा विचार बाहेरून आणलेल्या एखाद्या राजकीय किंवा सामाजिक मत-प्रणालीतून करणे गैर आहे. समीक्षेची सुरुवात साहित्य-कृतीच्या आंतरिक अभ्यासानेच व्हावयास पाहिजे.

साहित्य उघडपणे समाजदर्शन किंवा समाजाच्या मूल्यांचे दर्शन घडवेल असे नाही.

तथापि प्रत्येक साहित्यकृतीत तीन घटक असतात : सौंदर्यशास्त्राचा, मनोविज्ञानाचा, आणि सांस्कृतिक विचाराचा. प्रत्येक साहित्यकृती मूल्यांचे एक क्षेत्रच उभे करते. प्रत्येक चांगली साहित्यकृती एक विशिष्ट समाजदर्शन घडविते. हे दर्शन त्या साहित्यकृतीचे अन्ने खास असते. साहित्य– मग ते उच्चभ्रूंचे साहित्य असो (उदाहरणार्थ मराठीत बोरकर, पाडगावकर, रेगे, जी. ए. कुलकर्णी, तेंडुलकर इत्यादींचे साहित्य) की लोकप्रिय साहित्य असो (उदाहरणार्थ काकोडकर, कुसुम अभ्यंकर, बाबा कदम, जगदीश खेबुडकर, रमेश पडवळ इत्यादींचे साहित्य) असो– समाजाचे दर्शन घडतेच. लक्ष्मण माने यांच्या 'उपरा' मधील कडू अनुभव वाचतानाच शाळेतील त्यांचे काही शिक्षक, शालेय मित्र, त्यांचे समाजवादी सहकारी यांचे दर्शन घडतेच. ते याच समाजाचा भाग असतात. लेखकाच्या दृष्टीने आणि साहित्यकृतीचा उद्देश लक्षात घेता जी पात्रे महत्त्वाची नसतात त्या पात्रांतूनच सांस्कृतिक–समीक्षकाला नेमके समाजदर्शन घडते. संस्कृतीचा अर्थ कोणत्याही साहित्यात आढळतोच. जीवनाकडे पहाण्याचा प्रत्येक साहित्यकृतीचा स्वतःचा एक दृष्टिकोन असतो. खानोलकरांच्या साहित्यात चक्रावणारी नियती दिसते; मर्ढेकरांच्या काव्यात ईश्वरी शक्तीच्या अतर्क्यपणातून येणारा विषाद आणि उद्वेग दिसतो; रमेश पडवळांच्या नाटकात व्यभिचाराचे खापर समाजावर फुटते, कानेटकरांच्या नाटकात मध्यमवर्गीय संवेदनाशीलतेचा गौरव असतो. साहित्य आणि इतर कला यात समाजाच्या मूल्यांचे प्रतिबिंब तरी असते किंवा त्या मूल्यांशी संघर्ष तरी केलेला असतो. पण दोन्हीकडे मूल्यांचे दर्शन घडतेच. 'मला उद्ध्वस्त व्हायचंय'ची लेखिका जेव्हा राजकारणात एक विकलं तरी जावं लागतं नाहीतर पराजय तरी पतकरावा लागतो असं म्हणते तेव्हा नकळतपणे या समाजाचे मूल्य उघड होते. दलित संस्कृतीवरील तिच्या टीकेतील कडवटपणा बाजूला काढला तर दलित आणि दलितेतर समाजातील भिन्न मूल्ये स्पष्ट दिसतात.

लोकप्रिय साहित्य सहसा संघर्षाच्या भानगडीत पडत नाही. तत्कालीन समाजाची मूल्ये ते मांडते आणि काही बदल सुचवते. 'मामला चोरीचा', 'नवऱ्याची धमाल तर बायकोची कमाल' यासारख्या लोकप्रिय नाटकातही कुटुंबाचे प्रमुखत्व नवऱ्याकडे असावे, पत्नीने नवऱ्याशी शक्यतो पड खाऊन पण फारच हवे असेल तर समानतेच्या पण मित्रत्वाच्या भूमिकेतून वागावे यासारखी आजची प्रस्थापित मूल्ये दिसतात. 'कारभारनी, यंदा युरिया खत घातलंय शेतात. पीक आल्यावर बघ तुला दागिन्यांनी मढवतो.' या जाहिरातीतही पतीचे पत्नीविषयी कर्तव्य काय, पत्नी कशाला जास्त किंमत देते ही मध्यमवर्गीय मूल्ये शेतकऱ्याच्या तोंडात घातली आहेत. जाहिरात, वृत्तपत्रे या लोकांच्या नित्याच्या वाचनातील वाङ्मयातही सांस्कृतिक मूल्ये आढळतात. साहित्याची स्वायत्तता ही भूमिका गैरसमजावर आधारलेली आहे. प्रस्थापित मूल्यांना धुडकावणारे साहित्य देखील त्या समाजाचाच एक भाग असते. समाज आणि संस्कृती यांविना साहित्याला अस्तित्व असतच नाही.

साहित्यातून सांस्कृतिक मूल्यव्यवस्था कशी शोधायची हे सांस्कृतिक-समीक्षा दाखवते. सांस्कृतिक-समीक्षक आणि इतिहासकार यांच्या पद्धतीत खूप साम्य असते. इतिहासकार आणि सांस्कृतिक-समीक्षक या दोघांचे काम माणसे मोजण्याचे नसते तर माणसे तोलण्याचे असते. मानववंशविज्ञान, समाजविज्ञान यातील अनेक तत्त्वांचा, संशोधन-पद्धतींचा उपयोग साहित्याच्या सांस्कृतिक समीक्षेत करता येतो. जीवनलक्ष्यी समीक्षेला आणि जीवनवादी समीक्षकाला ही वाट विशेष आवडेल.

९

शेवटी भाषाविज्ञानातून साहित्य-समीक्षेला काय घेण्यासारखे आहे याचा विचार करू.

शैलीविज्ञान ही भाषाविज्ञानाने साहित्य-समीक्षेला दिलेली देणगी आहे. भाषेचे स्वरूप, वाक्यरचना सूत्रे, भाषेचा शब्दनिधी, अर्थविन्यासातील तत्त्वे आणि वर्गीकरणपद्धती यातून साहित्याकडे केवळ भाषेच्या अंगाने पाहण्याचा आणि त्यातून निर्मिती-प्रक्रिया आणि आस्वादन-प्रक्रिया यांचे स्वरूप समजावून घेण्याचा वैज्ञानिक मार्ग शैलीविज्ञानाने दिला आहे. व्यक्तिगत प्रत्ययाची नोंद यावर अजूनही मराठी-समीक्षा थांबली आहे. या प्रत्ययाचे समर्थन, अवलोकन करणे आवश्यक आहे. शैलीविज्ञान हा त्याचा मार्ग आहे.

भाषाविज्ञानात संरचनावाद हा सोस्यूरपासूनचा. संरचनावादी भाषाविज्ञानात भाषा ही एक व्यवस्था








मानली जाते. या व्यवस्थेतील घटक निरनिराळ्या स्तरावर तपासता येतात. व्यवस्थेच्या संदर्भातच घटकांना अर्थ प्राप्त होतो. घटकांच्या वेगवेगळ्या संरचना तपासणे हे संरचनावादी भाषाविज्ञानाचे ध्येय असते. साहित्यकृती ही सुद्धा एक भाषिक संरचना आहे. त्यामुळे संरचनावादी भाषाविज्ञानाच्या आधारे साहित्यही तपासता येते. संरचनावादी साहित्य–समीक्षा मराठीत झाली नाही कारण भाषाविज्ञानच मुळी येथे वेळेवर रुजले नाही. हा मागासलेपणा आता टाकायला हवा.

भाषा हा एक चिह्नव्यापार आहे. त्यामुळे चिह्नविज्ञानाचा भाषाविज्ञान हा एक भाग आहे असे म्हणता येईल. मात्र सुरुवातीच्या काळात तरी भाषाविज्ञानाच्या आधारेच चिह्नविज्ञानाची प्रगती झाली. साहित्य हे केवळ भाषिक व्यापार नव्हे. साहित्यात वेगवेगळी चिह्ने वापरली जातात. कवितेचा ताल, साहित्यातील सांस्कृतिक संकेत, रूपके, प्रतिमा यांचा चिह्ने म्हणून अभ्यास करता येईल. चिह्नविज्ञानाच्या आधारे साहित्य–समीक्षा करता येणे शक्य आहे. युरोपियन समीक्षेत याची नुकती कुठे सुरुवात होत आहे. मराठी समीक्षेने निदान यावेळी तरी उशिरा जागे होण्याची परंपरा सोडावी.

## १०

समीक्षेचे स्वरूप, तिचे कार्य, साहित्य आणि समीक्षा यांचे परस्पर संबंध आणि समीक्षेतील नवे प्रवाह यांचा आढावा आपण घेतला. (मार्क्सवादी समीक्षा आणि मनोवैज्ञानिक समीक्षा यांचा आढावा घेतलेला नाही.)

नव्याच्याबाबत मराठी समीक्षेत आज तीन प्रवृत्ती मला दिसतात. एक जुने ते सोने आणि म्हणून नव्याचा अव्हेर करण्याची. या प्रवृत्तीचे समीक्षक नव्याकडे संशयाने आणि भीतीने पाहतात. डोळस संशय हा नेहमीच स्वागतार्ह असतो, पण हट्टीपणातून येणारा संशय फक्त चिडचीड उत्पन्न करतो. आपल्या सुरक्षित कुरणात कोणी दुसऱ्याने शिरलेले अशा लोकांना आवडत नाही. विशेषतः इंग्रजी भाषेच्या द्वारे ज्यांना काही नवीन मिळाले आहे आणि जे ते मराठीत आणू पाहतात त्यावर त्यांचा राग असतो. ही प्रवृत्ती घातक आहे आणि स्वार्थी आहे. ज्ञानाच्या क्षेत्रात एका अर्थी शाश्वत आणि म्हणून सततचे जपण्याचे असे नाही नसते. त्यावाचून ज्ञानाची वृद्धी होणारही नाही. साहित्य–समीक्षा हे ज्ञानाचे एक दालन आहे. तिची वेगवेगळ्या अंगांनी वाढ होत असेल तर त्याचे स्वागत करायला हवे. मराठी साहित्य–समीक्षा ही कोणाची मक्तेदारी होता कामा नये.

दुसरी प्रवृत्ती मराठी साहित्याकडे पाठ वळवून फक्त पाश्चिमात्यांच्या विभिन्न पद्धतींचे गोडवे गाण्याची. अस्तित्ववादी लेखन, न-नाट्य यासारखे साहित्यप्रकार आणि भाषावैज्ञानिक, मनोवैज्ञानिक, सांस्कृतिक समीक्षा करण्याजोग्या साहित्यकृती मराठीत अभावानेच आढळतात हे खरे असले तरी केवळ उपहास आणि उपेक्षा यांनी कुणाचेच भले होणार नाही. सद्यस्थितीत इथल्या लोकांना पचेल एवढा विचार, समजेल अशा भाषेत मांडण्याचे प्राथमिक काम करणे कमीपणाचे नाहीच तर आवश्यक आहे.

उपहासातून वाढणारी तिसरी प्रवृत्ती म्हणजे टर उडविण्याची प्रवृत्ती. समीक्षेच्या प्रतिष्ठित मासिकातही ती गेल्या दहा वर्षांत दिसू लागली आहे. ही गोष्ट चिंताजनक आहे. या प्रवृत्तीचे समीक्षक उत्तम समीक्षकही नसतात, स्वतः साहित्यिक नसतात, किंबहुना चांगले रसिकही नसतात. अशा प्रवृत्तीने केलेली समीक्षा ही फार तुजवी असते; साहित्यापेक्षा साहित्यिक हे तिचे लक्ष्य असते.

अर्थात मराठी साहित्यावर प्रेम करणारे पण नव्याला सामोरे जाणारे काही थोडे समीक्षक मराठीत आहेत. आपणा सर्वांची या अल्पसंख्य गटात गणना व्हावी अशी इच्छा असणे स्वाभाविक आहे. त्यासाठी साहित्य, समीक्षा, आणि समीक्षेच्या नव्या वाटा यांबाबत आपली भूमिका तपासणे ही पहिली पायरी आहे.

■

## संदर्भ सूची

### इंग्रजी


Aurerbach Erich 1957, Mimesis : The Representation of Reality in Western Literature. trans. Willard Trask, Printeton.

Bradbury Malcolm and Palmer David (ed.) 1975 Contemporary Criticism. Stratford-Upon-Avon Studies-12 Edward Arnold Ltd.

Culler, Jonathan 1975. Structuralist Poetics. Routledge and Kegan Paul, London.

Eliot, T. S. 1953. The Use of Poetry and the Use of Criticism. Cambridge, Mass. and London.

Kelkar Ashok R. 1985. Interpretation of Literature ( Unpublished ).

Richards, I. A. 1925. Practical Criticism : A Study of Literary Judgement. Reprinted in 1970 : Routledge and Kegan Paul Ltd. London.

Warren, Austin and Wellek Rene' 1949. The Theory of Literature. New York and London.

मराठी

धोंगडे रमेश वा. आणि केळकर अशोक रा.(संपादक) १९८५. मराठी शैली-विचार. भाषाविज्ञान प्रगत अध्ययन केन्द्र, डेक्कन कॉलेज, पुणे ६.

धोंगडे रमेश वा. आणि धोंगडे अश्विनी १९८५. मराठी भाषा आणि शैली. दिलीपराज प्रकाशन, पुणे ३०.

## नवीन आजीव सभासद : ऑक्टोबर ८५ ते फेब्रुवारी १९८६

### पुणे विभाग

सर्वश्री—विजय प्र. जोशी, सत्यकुमार मोहिते, विमल पटवर्धन, नितीन भा. पतकी, रामदास नि. पाटील, वि. भा. देशपांडे, दीपा सु. वैद्य, रामचंद्र म. ओगले, वसंत म. भुजबळ, रामदास डुंबरे, जगन्नाथ वाळिंबे, शरश्चंद्र मुतालिक, मिलिंद साठ्ये, सतीश म. चिंचळकर, सूर्यकांत ए. देशमुख, रंजना चव्हाण, अनिल गोडबोले, बाळकृष्ण बापट, शांता ज. शेळके, मंगल मु. नाईक, वामन वा. टोळ, विजया श्री. जांभेकर, त्र्यंबक स. महाजन, अतुल व्यं. देशमुख, हिमांशु श्री. इंगळे, राधिका श्री. साठे, खंडेराव बेलसरे, सुनिती श्री. कुलकर्णी, ग. वा. करमरकर शोभना के. खडके ( कळंब, पुणे ) वी. आर. देशमुख ( ओतूर ) वसंत धु. पाटील, मंजिरी नेऊरगावकर, रामचंद्र दामले, श्रीकृष्ण दाते, विठ्ठल डुंबरे, जयवंत आहिवळे, प्रदीप निफाडकर.

### पुण्याबाहेरील

अलका खामकर, शशिकला जाधव, ( सातारा ) रा. ग. जाधव, ( वाई ) तुकाराम दा. पाटील, ( भोसे, मिरज ) प्रभाकर ब. कारभारी, शकुंतला आ. बोरसे, मंगल कुलकर्णी, मीनाकुमारी उपाध्ये, राजश्री शेळकर, ( सर्व धुळ्याचे ) दामोदर सु. उशीर, शशिकला व. पवार, प्रमोद कुलकर्णी ( सर्व नाशिकचे ) बापूसो. मंढाळकर, मुरलीधर दा. कुलकर्णी ( सोलापूर ) स. दि. महाजन ( नांदेड ) सुमन आ. भडभडे ( परळी वैजनाथ ) विजया कानडे, आशा डी. परदेशी ( ठाणे ) शंकर वि. जोशी (अंबरनाथ) ॲन फेल्डहाऊस (टेंपे ॲरिझोना, यु. एस. ए.)

## साभार स्वीकार : चरित्र

**राम गणेश गडकरी** : माधव गडकरी; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८५; रु. ८५ △ **डॉ. बाबासाहेब आंबेडकर** : भालचंद्र फडके; श्री विद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८५; रु. ७५ △ **व्ही. वी. कर्णिक** : द्वा. भा. कर्णिक; श्री विद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८६ रु. ३५ △ **मित्राय नमः** राजा मंगळवेढेकर; गुलाबराव कारले, सुरेश एजन्सी, पुणे २; १९८६; रु. ५० △ **दलित आत्मकथन** : संपा. चंद्रकुमार नलगे व गंगाधर पानतावणे; सुरेश एजन्सी, पुणे २; १९८६; रु. ५० △ **एक नमुनेदार विद्यार्थी : कृ. भा. बावर** : ( बालचरित्र ). सरोजिनी बावर; समाज शिक्षणमाला, पुणे ३०; १९८५; रु. २.

चन्द्रकान्त धांडे

# नाटककार माधव नारायण जोशी

गेल्या पिढीतील नामवंत विनोदी नाटककार माधव नारायण जोशी यांच्या जन्मशताब्दीचे वर्ष दि. ६ जानेवारी १९८६ रोजी संपले. वडिलांच्या नोकरीमुळे विदर्भ, पुणे, हैदराबाद या ठिकाणी राहून वडिलांच्या निधनानंतर ते पुणे येथे स्थायिक झाले. माधवरावांनी पोलिसखात्यात नोकरी करावी अशी त्यांच्या वडिलांची इच्छा असल्याने त्यांना कायद्याचा अभ्यास करावा लागला पण तो त्यांच्या प्रकृतीस मानवला नाही. त्यांनी पुणे येथेच मिलिटरी अकाऊंटस खात्यात पोटापाण्यासाठी नोकरी केली तरी त्यांचा नाटकाकडेच ओढा होता. त्यांनी १९१० च्या सुमारास कर्णार्जुन, कृष्णविजय ही नाटके लिहिली. किर्लोस्कर नाटक मंडळीने ती रंगभूमीवर आणली. बालगंधर्वांच्या भूमिका असलेली खाडिलकरांची संगीत पौराणिक नाटके पाहिलेल्या प्रेक्षकांना या नाटकात काही नवीन नव्हते त्यामुळे ती अपयशी ठरली. अशा नाटकांना आता लोक कंटाळले आहेत हे ओळखून वास्तव जीवनातील विसंगतीचे उपहासात्मक चित्रण करण्याचे धोरण त्यांनी आखले व सामाजिक सुधारणेच्या नावाने समाजात बोकाळलेल्या परिस्थितीचे विडंबन करणारे 'संगीत विनोद' हे नाटक लिहिले. सवाई गंधर्वांच्या नूतन संगीत मंडळीने ते १९१६ मध्ये रंगभूमीवर आणले. यातील बोचऱ्या टीकेमुळे खळबळ माजली. काही सुधारणावाद्यांनी ते बंद पाडण्याची खटपट केली पण ती यशस्वी झाली नाही. नाटककार म्हणून माधवराव जोशी यांचे नाव झाले आणि नाटक करणाऱ्या मंडळींना भरपूर अर्थप्राप्ती झाली असा या नाटकाचा इतिहास आहे. केवळ प्रेक्षकांचे मनोरंजन व्हावे या हेतूने त्यांनी 'करमणूक', 'हास्यतरंग' ही नाटके लिहिली. पुढे केवळ मनोरंजन हे नाटकाचे ध्येय नसून त्यातून लोकशिक्षणही झाले पाहिजे या दृष्टीने त्यांनी 'संगीत स्थानिक स्वराज्य अर्थात म्युनिसिपालिटी', 'वऱ्हाडचा पाटील', 'गिरणीवाला' इत्यादी नाटके लिहिली. यातील म्युनिसिपालिटी फार लोकप्रिय झाले. स्थानिक स्वराज्य संस्थातील कारभार कसा बेशिस्तपणे चालतो त्याचे चित्र या नाटकात दिसते. विनोद आणि अतिरंजन यांनी वास्तवतेला खमंग आणि चटकदार रूप देण्याचा प्रयत्न सफल झाला. 'सं. वऱ्हाडचा पाटील' या नाटकात खानदानी-दिलदार पाटील आणि त्यास लुबाडणारे समाजातील दांभिक लोक यांचे चित्रण लोकांना आवडले. जुन्या पाटलांच्या पदरी असलेले नोकर कसे प्रामाणिक आणि नीतिमान असतात ते या नाटकात दाखविलेले आहे. 'गिरणीवाला' या नाटकात मालक आणि मजूर यांचे नाते पितापुत्रासारखे असते असे दाखविलेले असून यात एक प्रेमकथाही गुंफलेली आहे.



माधव नारायण जोशी

समाजजीवनातील वेगवेगळ्या थरातील दांभिक माणसांचे चित्र त्यांच्या अनेक नाटकात आलेले आहे.

केवळ साधे सर्टिफिकेट असलेला व पेशंटला लुबाडणारा डॉक्टर स्वतःच कसा फसतो आणि नाइलाजाने सर्व अभिलाषा सोडून आपल्याच मजुरणीशी कसे लग्न करतो ते ' संगीत वशीकरण ' या नाटकात दाखविलेले आहे. कर्जबाजारी झालेला कवीश्वर भावाच्या मृत्यूपत्रामुळे मिळणारी रक्कम कर्जापोटी जाऊ नये म्हणून ज्या युक्त्या करतो त्यातून कसे गोंधळ आणि गमती होतात हे ' पैसाच पैसा ' या नाटकात दिसते. हास्यतरंग, करमणूक, कॉलेजियन, उधार उसनवार या नाटकांतून तारुण्यसुलभ वृत्तीचे मिस्किल दर्शन घडते. गैरसमज, फजिती आणि घोटाळे यामुळे ही कथानके रंगतदार झाली. प्रेमगुंफा, पद्मिनी विलास, प्रेमसागर, प्रो. शहाणे, विश्ववैचित्र्य, सत्वसाफल्य, पुनर्जन्म, प्रेमळ लफंगे, मोरांचा नाच, आनंद इत्यादी मिळून एकूण चोवीस नाटके माधवरावांनी लिहिली आणि नूतन संगीत मंडळी, अरुणोदय संगीत मंडळी, किर्लोस्कर संगीत मंडळी, नूतन महाराष्ट्र मंडळी आणि दामुअण्णा मालवणकर यांची प्रभाकर नाटक मंडळी अशा संस्थांनी ती रंगभूमीवर आणली. या नाटकांचे एक यशस्वी पर्व होऊन गेले.

### विविध स्वभावाच्या व्यक्तिरेखा :

माधवराव जोशी यांना मानवी स्वभावाचे मोठे मार्मिक ज्ञान होते हे त्यांच्या नाटकातील विविध पात्रांच्या स्वभावरेखनावरून दिसून येते. त्यांच्या नाटकातील पात्रांची नावेही विनोदी आहेत. डॉ. गीध, हंसी, चिमणी, कावळे, बेकूबखाँ, हरामजादे, गणपतराव सोंडाजी, मारोतीराव शेपटे, प्रो. घालमिलकर, चुंबिका, धीवरचंद, रेवडीबाई, डॉ. वचनाग, कोंडिबा सलूनवाले, प्रो. ठोंबे, वराहशास्त्री, धेनुवल्लभ ही सर्व नावे या दृष्टीने उल्लेखनीय आहेत. ' कॉलेजियन ' या नाटकातील शंभ्या हे पात्र मोठे वैशिष्ट्यपूर्ण आहे. त्यास ब्राह्मण व्हावेसे वाटते. तो जानवे घालतो, संध्या करतो आणि ब्राह्मणी शब्दांचा वापर करतो. ' उदाक म्हंजी पानी, वस्तार म्हंजी धोतार, पत्रोळ म्हंजी इस्तारी, कुत्र म्हंजी शवान, लघुशंका म्हंजी इराकत म्हनाव ' या शब्दावलीने त्याने आपल्या बायकोसाठी केलेले ज्ञानप्रदर्शन विलक्षण विनोदी झाले आहे. मुंज करण्यासाठी हरणाचे कातडे लागते म्हणून तो हरणाच्या कातड्याची चप्पल लांबवतो आणि त्याच्या भाबडेपणातून विनोद निर्माण होतो. ' मोरांचा नाच ' या नाटकात पहिलवान आडमुठे आणि गुंडाप्पा ही पात्रे आहेत. गुंडाप्पा हे गडकऱ्यांच्या महेश्वराचे अनुकरण दिसते.

### नाट्यरचनेचे तंत्र :

माधवराव जोशी यांच्या नाटकात अनेक नवीन विषय आले असले तरी त्यांचे लेखन परंपरागत रीतीनेच झाले आहे. त्यांच्या सर्व नाटकात नटी आणि सूत्रधार यांचा प्रवेश असून आपली लेखनविषयक भूमिका मांडण्यासाठी किंवा सामाजिक टीका करण्यासाठी त्यांचा उपयोग केलेला आहे. ' हास्यतरंग ' नाटकातील कवी सांगतो, ' हे माझे प्रहसनात्मक नाटक केवळ चिंताग्रस्त जीवनकलहाच्या दगदगीने थकले भागलेले, संसाराच्या अडचणींनी गांगरलेले किंवा दृश्य जगातील काही गमतीचे प्रसंग, घोटाळे, डावपेच वगैरे अनेक चालती बोलती चित्रे पाहून आपलं मनोरंजन करणारे– यांच्याकरिता लिहिलेले आहे. माझ्या नाटकात भगवद्गीतेचा तोफखाना नाही, धर्मसिंधूच्या मशिनगन्स नाहीत, पतीपत्नींच्या विरहाग्नीचे ज्वालामुखी नाहीत. भावनांच्या आतड्याला पीळ देऊन त्या तांतेने आपुक मापुक फाशी दिलेले नाहीत. करुणरसाची, दुःखाची, तळतळाटाची रडारड, बोंबाबोंब बिलकूल नाही. अर्जुन-भीमाच्या बोकांडी राजकारण दडपलं नाही.' या उद्‌गाराने तत्कालीन नाटकांवर टीका करण्याचा हेतू साध्य झालेला आहे. ' संगीत वऱ्हाडचा पाटील ' या नाटकात सूत्रधार म्हणतो, ' दागिने म्हणजे जशी बायको नव्हे तसंच गाणं म्हणजे नाटक नव्हे ! प्रथम उत्कृष्ट नाटक म्हणजे बायको पाहिजे व त्यांना सुशोभित करायला गाणं किंवा अलंकार पाहिजे ! जसं दागिन्यांचं गाठोडं म्हणजे बायको नव्हे त्याप्रमाणे तुमच्या तानांची भेंडोळी म्हणजे नाटक नव्हे ' या उद्‌गारात संगीत नाटकाला कशी अवस्था आलेली होती ते स्पष्ट दिसते. ' सं. कॉलेजियन ' या नाटकात सूत्रधाराने वकिलांची टवाळी केली असून ' सं. आनंद ' या नाटकात बेजबाबदारपणा आणि कुटाळ टीकाकारांचा खरपूस समाचार घेतलेला आहे.

एखादे कथानक घ्यायचे आणि संवादाच्या माध्यमातून वाचकांना सतत हसत ठेवावयाचे हे माधवराव जोशी यांच्या नाटकाचे तंत्र होते. त्यांच्या नाटकातील पात्रे वेषांतर करतात. वेगवेगळी सोंगे घेतात आणि

त्यातून झालेला गोंधळ प्रेक्षकांना हसवतो. नाटकाचा मुख्य भर संवादांवरच असल्याने या नाटकात खलपात्रांना फारसे स्थान नाही. अशी नाटके लिहिण्याची प्रेरणा इंग्रजीतील अनेक नामवंत लेखकांचे फार्स वाचल्याने मिळाली असे त्यांनी नमूद केले आहे. नवीन पद्धतीची म्हणून त्यांनी अखेरीस एकांक-एकप्रवेशी नाटके लिहिली पण त्यातही नटी आणि सूत्रधार कायम ठेवले. नवीन प्रकारचा विनोद, अभिनव चमत्कृतीपूर्ण कल्पनांचा विलास, जीवनातील वास्तवाचे आकर्षक प्रदर्शन या गुणांमुळे त्यांची नाटके लोकप्रिय ठरली. नटांचे उच्चार नेमकेपणाने व्हावेत यासाठी ते स्वतः तालमी घेत यावरून त्यांचे नाट्यप्रेम व्यक्त होते.

### भाषा आणि विनोद :

माधवराव जोशी यांची भाषा प्रासादिक व नाट्यानुकूल आहे. अन्योक्ती, वक्रोक्ती, मार्मिक कोट्या, समर्पक अर्थवाही शब्द या गुणांनी ही भाषा संपन्न आहे. पंढरी पाटील वऱ्हाडी बोलीत बोलतात. मुसलमान, मारवाडी, कानडी, पारसी या समाजातील लोकांची भाषा नाटकाला स्वाभाविक रूप देते तर त्यांची मराठी भाषा विनोद निर्माण करते. शाब्दिक, प्रासंगिक आणि कल्पनारम्य अशा प्रकारचा विनोद त्यांच्या नाटकात दिसतो. विनोदाच्या दृष्टीने 'सं. स्थानिक स्वराज्य' हे त्यांचे सर्वश्रेष्ठ नाटक आहे. या नाटकातील झाडूवाली आणि मुकादम यांचा प्रेमळ संवाद, दवाखान्यातील सावळागोंधळ आणि तेथेच 'पेशंट दूध मागतो' असे सांगणाऱ्या नर्सला 'पाज त्याला' असे डॉक्टरने दिलेले मासलेवाईक उत्तर असे अनेक विनोदी प्रसंग त्यांच्या नाटकात दिसतात. फसवणूक करणारे प्रसंग अनेकदा विनोद निर्माण करतात. क्वचित प्रसंगी हा विनोद अश्लील भावसूचक असतो. या नाटकातील विडंबन गीतांनी त्यांची लोकप्रियता अधिक वाढली. 'मी अधणा न शिवे कधीही पुनः', 'या नवनवल मधु लाडवा', 'माता बसली स्वर्गही रखडत' ही विडंबन गीते लोकांच्या गुणगुणण्यात होती. वऱ्हाडचा पाटील या नाटकातील भजनाच्या चालीवर सावकाराच्या गाण्यातून त्याच्याच ढोंगी व्यवहाराचे वर्णन, बेकूबखाँ याचे हिंदी गाणे, लोलकचंदाचे मारवाडी गाणे हे प्रकार नवीन आणि विनोदी असल्याने प्रेक्षकांनी त्यांचे स्वागत केले. 'शिंग फुंकीत गेला पाण्याचा इंग्रजी बंब' आणि 'म्होतुर झाल्यावरी मी सांगेन तसेच वागायचे' ही 'स्थानिक स्वराज्य' मधील लावणी, आणि पोवाड्याच्या चालीवरील विनोदी गाणीही लोकप्रिय झाली.

आपल्या नाटकातील पात्रांच्या संवादातून विनोदाप्रमाणेच सामाजिक टीकाही माधवराव जोशी यांनी साधली आहे.

'सं. वशीकरण' या नाटकात अरसिक प्रेक्षकांवर टीका आहे. 'सं. हास्यतरंग' या नाटकात भ्रष्टाचारावर टीका आहे. या नाटकातील बकूल शालेय अभ्यासक्रमावर टीका करते. 'मेले शिक्षणक्रम ठरविणारे शुद्धीवर होते की नाही कोणास ठाऊक?' असे तिने विचारले आहे. वऱ्हाडच्या पाटलांना फसवणाऱ्या मंडळीत एक नाटकवालाही आहे. त्या निमित्ताने नाटक धंद्यातील अनेक अनिष्ट प्रवृत्तींचा समाचार नाटककाराने घेतलेला आहे. अभ्यासाकडे फारसे लक्ष न देणारे व पोस्टमनने आणलेल्या मनीऑर्डरमुळे पितृदर्शनापेक्षा अधिक आनंद होणारे 'कॉलेजियन' पाहून गंमत वाटते.

### नाट्यसंमेलनाचे अध्यक्षपद :

१९४४ साली जळगाव येथे भरलेल्या नाट्यसंमेलनाच्या अध्यक्षपदाचा मान माधवराव जोशी यांना मिळाला. आपल्या अध्यक्षीय भाषणात त्यांनी नाट्यास मारक ठरणाऱ्या संगीतावर आणि पौराणिक व ऐतिहासिक नाटकातील नटांच्या अतिरेकी अभिनयावर टीका केली. नाटकातील पात्रांच्या भावना, कल्पना आणि विकार प्रेक्षकांना समजण्यासाठी नटाची वाणी खणखणीत असली पाहिजे असे त्यांनी आवर्जून सांगितले. नटांनी आपली भूमिका समजावून घेतली पाहिजे. तिचा अभ्यास केला पाहिजे. नाटककारानेही यशस्वी होण्यासाठी आठ-दहा वर्षे श्रम घेतले पाहिजेत. वाङ्मयाचा अभ्यास केला पाहिजे. आणि बदललेल्या परिस्थितीत राष्ट्र निर्माण करणारी नाटके निर्माण झाली पाहिजेत असे त्यांनी सांगितले. त्यांच्या बहुतेक सर्व नाटकातील भरतवाक्य म्हणजे देश स्वतंत्र होण्यासाठी केलेली प्रार्थना आहे.

देश स्वतंत्र व्हावा, त्याचा उद्धार व्हावा अशी प्रार्थना करणारे नाटककार माधवराव जोशी देश स्वतंत्र झाल्यानंतर १६ ऑक्टोबर १९४८ रोजी मरण पावले.

■

# ग्रंथ-परीक्षण

: १ :

## आचार्य भागवत संकलित वाङ्मय, खंड १ ला

**संपादक : अ. के. भागवत**

**परीक्षण : ग. प्र. प्रधान**

[ सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मंत्रालय, मुंबई मूल्य रु. २५ ]

**तत्त्व विवेचन करणारा मौलिक लेखसंग्रह**

आचार्य स. ज. भागवत हे गांधी युगातील एक व्यासंगी विद्वान, निष्ठावान कार्यकर्ते आणि प्रभावी वक्ते. आचार्य भागवत आणि आचार्य जावडेकर हे दोघे सहकारी आणि निकटचे स्नेही. आचार्य जावडेकरांनी विपुल लिहिले. आचार्य भागवतांचे लेखन त्या मानाने कमी आहे. भागवत म्हणत असत, "लिहिणे हे जावडेकरांचे माध्यम आहे. बोलणे हे माझे माध्यम आहे." आचार्य भागवतांची भाषणे अतिशय रंगत. ते प्रतिपक्षावर प्रखर हल्ला करीत. त्यांचे शब्द विलक्षण धारदार असत आणि त्यांची भाषणाची शैली आक्रमक असे. विचार गांधीवादी पण त्या विचारांचा आविष्कार तिखट, झणझणीत अशी ती भाषणे असत. त्याच बरोबर त्या भाषणांमध्ये भरपूर माहिती असे, मार्मिक विश्लेषण असे आणि सत्याचे व न्यायाचे जोरदार समर्थन असे. आचार्य भागवतांना कालवश झाल्यालाही आता एक तप उलटून गेले. एका वेळी महाराष्ट्रातील अनेक कार्यकर्त्यांना स्वतंत्रपणे विचार करायला शिकविणाऱ्या आचार्यांच्या अनेक आठवणी माझ्या पिढीतील कार्यकर्त्यांच्या मनात अजूनही रेंगाळत आहेत. त्यांच्या लेखांचे दोन खंड प्रसिद्ध करण्याचा निर्णय महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाने घेतला, त्यापैकी एक खंड प्रसिद्धही झाला आणि दुसरा प्रकाशनाच्या मार्गावर आहे हे अतिशय उचित झाले.

आचार्य भागवतांच्या संकलित वाङ्मयाच्या पहिल्या खंडाचे पाच भाग आहेत ते पुढीलप्रमाणे :

( १ ) तत्त्वविचार ( २ ) महाराष्ट्राचा मूल्यविचार : भूत, वर्तमान व भविष्य ( ३ ) लो. टिळक आणि गीता (४) महात्मा गांधी—जीवनसाधना व तत्त्वविचार (५) म. गांधी प्रणीत रचनात्मक कार्यक्रम, शिक्षण इ. सहाव्या भागात आचार्य भागवतांनी लिहिलेली तीन पत्रे आहेत.

आचार्य भागवतांनी सौ. मृणालिनी देसाई यांना लिहिलेले पत्र त्यांच्या स्वभावावर प्रकाश टाकणारे आहे. ते स्वतःबद्दल लिहितात: "माझ्या जीवनावर प्रखर बुद्धिवादाचा एवढा जबरदस्त पगडा आहे की त्याखाली माझ्या भावना कितीही उसळून आल्या तरी त्या बुद्धिवादाची चौकट खिळखिळी करू शकत नाहीत...पण माझ्या बुद्धिवादाची बैठक भावनांवरच आधारलेली आहे.......तत्त्वप्रेम आणि मानवप्रेम या दोन प्रवृत्ती माझ्या जीवनात सारख्याच सत्ता गाजवीत असतात. एखादे वेळी त्यांचा एकमेकांशी कलह होतो आणि त्यामुळे मला मानसिक व्यथा होते." या काही वाक्यावरून आचार्य भागवत स्वतःकडे कसे तटस्थतेने पाहू शकत हे समजून येते.

लेखसंग्रहाच्या सुरुवातीस प्रास्ताविकामध्ये या लेखसंग्रहाचे संपादक प्रा. अच्युत केशव भागवत यांनी आचार्य स. ज. भागवत यांचे जीवन चरित्र व त्यांची जडण घडण यासंबंधी थोडक्यात पण अतिशय मार्मिकपणे लिहिले आहे. सनातनी कुटुंबात जन्मलेल्या व वाढलेल्या आचार्य भागवतांच्यावर विद्यार्थी दशेत झालेले संस्कार, महात्मा गांधींनी १९२० च्या चळवळीत दिलेल्या आदेशानुसार कॉलेज सोडून महाडच्या राष्ट्रीय शाळेत त्यांनी १९२१ ते १९२६ या काळात केलेले अध्यापन, १९२७ पासून पुण्याच्या लो. टिळक महाविद्यालयात आचार्य म्हणून केलेला या काळातील त्यांचा गाढ विद्या व्यासंग, तसेच १९३० व १९४२ मध्ये स्वातंत्र्य चळवळीत त्यांनी

सोसलेला कारावास, १९३७ पासून वर्धा शिक्षण योजनेच्या मूलतत्त्वांचा त्यांनी केलेला प्रसार आणि स्वातंत्र्य मिळाल्यानंतर कोल्हापूरजवळील गारगोटी येथील मौनी विद्यापीठात त्यांनी केलेले कार्य, हे आचार्यांच्या आयुष्यातील ठळक टप्पे समजल्यामुळे वाचकाला त्यांच्या लेखनाचे मर्म अधिक चांगले समजेल. कारण आचार्य भागवतांचे लेखन हा केवळ बुद्धिविलास नाही. त्यांच्या क्रियाशील, ध्येयवादी जीवनाचा तो एक अविभाज्य भाग आहे.

आचार्य भागवत हे म. गांधींच्या विचारांचे व कार्यप्रणालीचे एक प्रवक्ते आणि भाष्यकार होते हे खरे. परंतु त्यांचे चिंतन म. गांधींच्या तत्त्व विचारापुरते मर्यादित नव्हते. त्यांनी जगातील तत्त्वज्ञांच्या विचारांचा तसेच विविध धर्मांच्या प्रेषितांनी मांडलेल्या तत्त्वांचा दीर्घकाल व मूलग्राही अभ्यास केलेला होता. पहिल्या तीन भागातील लेखांवरून आचार्यांच्या चतुरस्त्र बुद्धीची आणि विशाल व व्यापक दृष्टिकोणाची पुरेपूर कल्पना येते. विशेषतः पहिल्या भागातील 'व्यासांचा आक्रोश', 'सामाजिक जीवनाच्या मूल्यांचे विवेचन', अध्यात्म आणि विज्ञान' हे व अन्य लेख वाचकाच्या विचारांना निश्चितच चालना देणारे आहेत.

लेखांच्या दुसऱ्या भागातील लेखांतून महाराष्ट्रातील संतांच्या कार्याचे मूल्यमापन आचार्य भागवतांनी अत्यंत सडेतोडपणे केले आहे हे आढळून येते. विद्यार्थीदशेत आचार्य भागवत यांच्या मनावर रामदासांच्या शिकवणुकीचा फार मोठा संस्कार झाला होता. समर्थांच्याबद्दल त्यांच्या मनात आदर होता पण अंधभक्ती नव्हती म्हणून ते लिहितात :

"आज समर्थांच्या स्मरणकाळी त्यांच्या वैराग्याचा, शुद्धतेचा, समाजहित-चिंतनाचा, सामर्थ्याचा संदेश आपण घेताना तो ऐतिहासिक दृष्टीने पारखून, शुद्ध करून, वाढवून घेतला पाहिजे. नाहीतर शब्दप्रामाण्याने वागून समर्थांच्या उणिवांचाही जर आपण आग्रह धरला तर जीवनाच्या संग्रामात आपले निशाण अचल राखणे शक्यच होणार नाही."

'नव्या महाराष्ट्राची जीवन निष्ठा' हा लेख अतिशय उद्बोधक आहे.

आचार्य भागवत यांनी भगवद्गीतेचा सूक्ष्म अभ्यास केला होता. 'गीता– टिळक आणि गांधी' : ('कर्मयोग आणि सत्याग्रह') या पुस्तकाची प्रस्तावना– 'कर्मयोगी अध्यात्म आणि गीता' ही तिसऱ्या भागात समाविष्ट करण्यात आली आहे. आचार्य भागवतांचे हे प्रतिपादन सर्वांना मान्य होईल असे नाही. परंतु ते वाचताना त्यांच्या स्वतंत्र दृष्टिकोणाचा प्रत्यय येतो. याच संदर्भात 'कर्मयोगातून सत्याग्रहाकडे' हा चौथ्या भागातील लेख वाचल्यावर आचार्यांची भूमिका अधिक स्पष्ट होते. 'गांधीजींचे जीवनदर्शन' हा लेख अतिशय महत्त्वाचा आहे. आचार्य भागवतांच्या व म. गांधींच्या विचारांत काही वेगळेपणा व फरक आहे. आचार्य भागवत हे आधुनिक विज्ञानाचे आणि त्यातून येणाऱ्या समृद्धीचे स्वागत करतात. बुद्धिप्रामाण्यवादाचे ते कडवे समर्थक आहेत. पण असे असले तरी अध्यात्म हे त्यांच्या भूमिकेशी विसंवादी नाही. ते लिहितात, "मानवी मनाच्या प्रवृत्ती व निवृत्ती या दोन जाणिवा असून प्रवृत्ती ही बहिर्मुख जाणीव आहे. तिच्यातून विज्ञान निर्माण होते. तर निवृत्ती ही आंतरिक असून ती आत्मज्ञानापर्यंत नेते. जीवन–सत्याचा शोध घेणारी ही दोन दर्शने असल्यामुळे त्यांच्यात विरोध नाही.

मात्र आचार्य भागवतांचा पारंपारिक अध्यात्मावर विश्वास नाही. म. गांधींच्या व आचार्यांच्या 'संन्यास' या कल्पनेतही फरक आहे. म. गांधींच्या कल्पनेप्रमाणे संन्यास हा मुख्यतः परमेश्वराच्या शोधासाठी घेतला जातो. आचार्य भागवतांच्या मते संन्यासी हा स्वतःच्या जीवनाबद्दल विरक्त असला तरी समाजहिताबद्दल दक्ष असला पाहिजे आणि तो सत्तेपासून दूर असला तरी राजकारणाकडेही त्याने लक्ष पुरविले पाहिजे.

आचार्य भागवतांनी म. गांधींच्या शिक्षण विषयक विचारांचे महत्त्व अतिशय समर्थपणे विशद केले आहे. पाचव्या भागातील शिक्षणविषयक लेखांमध्ये शिक्षणाचा मूलग्राही विचार केलेला आहे. "जीवनातील त्रिपदा गायत्री" हा विद्यार्थ्यांचे अध्ययन पूर्ण झाल्यावर त्याला करावयाच्या उपदेशासंबंधीचा लेख अतीव सुंदर आहे. वर्धा शिक्षण योजनेमागील तत्त्वविचार आणि तिचा शैक्षणिक आशय याबाबत लिहिलेले लेख मौलिक आहेत.

आचार्य भागवत यांच्या लेखनात काही अपूर्णता आहे. जवाहरलाल नेहरू व आचार्य विनोबा भावे यांच्या अपयशाची त्यांनी केलेली मीमांसा बरोबर वाटत नाही. परंतु आचार्यांची सर्व मते पटली नाहीत व त्यांच्या



अनुक्रमणिका

विवेचनातील काही कच्चे दुवे गवसले तरी त्यांचे लेखन वाचकांना सतत विचार प्रवृत्त करते, हेच या लेखनाचे मोठे सामर्थ्य आहे.

आचार्य भागवतांच्या या लेखांचे संपादन प्रा. अ. के. भागवत यांनी साक्षेपाने केले आहे. हा लेखसंग्रह वाचल्यावर आचार्य भागवतांच्या अन्य विषयांवरील लेखांचा दुसरा खंड लवकर प्रसिद्ध व्हावा अशी अपेक्षा निर्माण होते. ■

## : २ :

## आविष्कार : वि. शं. पारगावकर यांच्या निवडक कथा

परीक्षण : डॉ. श्रीधर रंगनाथ कुलकर्णी

[ प्रतिमा प्रकाशन, १३५९ सदाशिव, पुणे ३०. मूल्य रु. ७० ]

आपल्याच मुलात एखादं अपत्य विशेष लाडकं असावं त्याप्रमाणं ललित वाङ्मयाचे विविध प्रकार हाताळणाऱ्या पारगावकरांचा जीव लघुकथेवर अधिक जडलेला दिसतो. त्यांच्या निवडक कथांचा 'आविष्कार' या नावानं नुकताच प्रकाशित झालेला संग्रह वाचल्या-नंतर तर हे विशेषेकरून प्रत्ययास येतं. केवळ संख्या-वळाचाच विचार केला तर वि. शं. पारगावकरांच्या १२ कादंबऱ्या आतापर्यंत प्रकाशित झालेल्या आहेत. त्या मानाने त्यांचे लघुकथा-संग्रह अवघे पाच आहेत. या पाचांतून निवडलेला हा सहावा 'आविष्कार'. या संग्रहात लेखकाच्या अगदी पहिल्या कथेपासून ते अलिकडे नावाजलेल्या कथांपर्यंतच्या निवडक कथा आल्या आहेत. पारगावकरांच्या कथालेखनाचा सामग्र्याने आढावा घेण्यास हा संग्रह उपयुक्त ठरावा.

या अपेक्षेनेच वाचक 'समग्र लेखकाच्या अभ्यासाचे प्रश्न' हे प्रा. स. शि. भावे यांचे प्रास्ताविक वाचतो. त्यायोगे अगदी उंबरठ्यावरच एवढी ठेच लागली की माझा तोल आतल्या बाजूस गेला म्हणून 'आविष्कार' शेवटपर्यंत वाचू शकलो. तोल बाहेरच्या बाजूस गेला असता तर हे परीक्षण लिहिण्याचा प्रश्नच उद्‌भवला नसता !

अकरा पानांचे प्रा. स. शि. भावे यांचे प्रास्ताविक एखाद्या प्रश्नोपनिषदासारखे वाटते. सभापर्वातील नारदाच्या कल्पित प्रश्नांच्या अध्यायाचे स्मरणही कित्येकांना होण्यासारखे आहे. या प्रश्न-मालिकेतून प्रा. भावे यांना पारगावकरांच्या लेखनाविषयी नेमके काय सुचवावयाचे आहे याचा बोध मला तरी झाला नाही. हा माझ्या बुद्धिमत्तेचाही दोष असू शकेल ! परंतु माझ्या हाती फारसं लागलं नाही एवढं खरं. 'अन्नदाता सुखी भव !' असा यांत्रिकपणे ढेकर देऊन ताटावरून उठणाऱ्या माणसांप्रमाणे शेवटच्या काही पानांत प्रा. भावे यांनी पारगावकरांची भलावण केली असली तरी समग्र लेखकाविषयीचा त्यांचा अभिप्राय नेमका काय आहे हा प्रश्न मला तरी सुटला नाही. 'आविष्कारा'च्या आस्वादाच्या आड तो प्रश्न येईल असेही वाटत नाही !

पारगावकरांचे कथाविश्व विविध आहे. या विश्वाला स्वतःचे असे रेखीव आणि वैशिष्ट्यपूर्ण व्यक्तिमत्व आहे. विशेष जाणवते ती कथांची 'एकरसता'. मुशीत रस ओतून सुरेख ओतीव मूर्ती घडवावी त्याप्रमाणे प्रत्येक कथेत वातावरण, घटना-प्रसंग, व्यक्तिविशेष इत्यादी घटक एवढे एकजीव झाले आहेत की, पढिक पंडितां-प्रमाणे त्यांचे विश्लेषण करणे अरसिकतेस आवाहन करणारे ठरेल. प्रत्येक कथेत अनुभूतीचा एकसंध पट उलगडला जातो. एवढे असूनही कथांमध्ये साचेबंदपणा कुठेही आलेला नाही. जीवनाच्या विविध अवस्था आणि मानवी मनाचे इंद्रधनुष्य प्रत्येक कथेत आपले निराळेपण दाखवून जाते. त्यामुळे कोणत्याही दोन कथांचा तोंडवळा सारखा आहे असे कधीच वाटत नाही.

साहित्य क्षेत्रात अलिकडे लोकप्रिय झालेल्या 'बांधीलकी' या संकल्पनेपासून लेखक मुक्त आहे हा आजच्या ललितवाङ्मयाच्या दृष्टीने वाचकांना मिळणारा फार मोठा दिलासा आहे. समाजातल्या कोणत्याही

एका वर्गाशी लेखकाने स्वतःला बांधून घेतले नाही. त्याचप्रमाणे जीवनविषयक कोणत्यातरी तत्त्वज्ञानाचा पुरस्कार करण्याचे कंकणही त्याच्या मनगटावर आढळत नाही. त्यामुळे सहज आणि निर्मळ मानव निरनिराळ्या कथांतून दृष्टिपथात येतो. पारगावकरांची ही अलिप्तता आणि स्वतःच्या अनुभूतीशी असलेले इमान हे ' आविष्काराचे ' फार मोठे बलस्थान आहे. ढगांचे भ्रमण, धुळीचे लोट, मुसळधार पाऊस यांपासून आकाश नेहमीच अंतरावर असते त्याप्रमाणे मराठी कथेच्या क्षेत्रात नवता, सूचकता, मानसिक आंदोलने, बंडखोरी इत्यादी अनेक प्रवाहांचे, प्रतिमांचे आणि वादांचे अवागमन झालेले आणि होत असलेले दिसत असले तरी पारगावकरांचे अभिजात कथाविश्व आगंतुक धूळवाऱ्याने गढूळलेले दिसून येत नाही. त्यांची पहिली कथादेखील तीस वर्षानंतरच्या कथेइतकीच टवटवीत आणि तजेलदार वाटते.

पारगावकरांच्या आविष्काराचा आणखी एक विशेष असा की, त्यांच्या कथांतून येणारा निसर्ग केवळ अलंकरणार्थ अथवा शोभेसाठी येत नाही. तो उपरा नाही. कर्णाच्या कवचकुंडलासारखा तो अंगभूत आहे. उघडा–बोडखा माळ, बागेतली रंगी–बेरंगी फुलं, आभाळातले ढग, पावसात भिजणारे कोकरू, घराच्या बंदिवासात असलेले ससे हे सारं उपरं नाही. मूळ अनुभूतीच्या रंगरेषांशी व जातकुळीशी ते एकरूप झालेले आहेत. कथांतल्या पात्राइतकाच जिवंतपणा या घटकांतही प्रत्ययास येतो. कलात्मक आविष्काराची फार मोठी उंची या निर्जीव वाटणाऱ्या घटकांच्या योगाने साधण्यात लेखकाने यश मिळविले आहे.

मनोविश्लेषणाचा वा मानवी मनाच्या प्रवृत्तींचा फारसा गवगवा न करता पारगावकरांनी मानवी मनाचे सांदी-कोपरे उजळ करून दाखविले आहेत. ' डोंगर-मिठीतील ' स्त्री-पुरुष ' मोरा 'शी संलग्न असलेला भूतकाळ ' स्वाती 'च्या आई-वडिलांची मानसिक आंदोलने, मांजर अशा कितीतरी कथांची उदाहरणे देता येण्यासारखी आहेत.

दलितांच्या बंडखोरीला पारगावकरांनी वाचा फोडली नसली तरी त्यांनी चित्रित केलेले दलितांचे जीवन काळजाला घरे पाडून जाते. ग्रामीण जीवनाचा बोलबाला न करताही ग्रामीण जीवनातील विविध चित्रे अगदी रेखीवपणे पारगावकरांनी रेखाटली आहेत. आपल्या कथांना जातकुळीची लेबले ते डकवीत नाहीत. जात-कुळी, सामाजिक थर, प्रादेशिक नूर इत्यादी वेष्टनांच्या पलीकडे असलेला बहुरुपी मानव व व त्याचे अंतरंग यांचा वेध घेण्यात पारगावकरांची प्रतिभा रमून जाते. म्हणूनच कोणत्याही ठराविक घाटात वा थाटात त्यांची कथा प्रकट न होता तिला केवळ स्वतःचाच असा वैशिष्ट्यपूर्ण आविष्कार असतो.

' आविष्कारा 'चं हे विलोभनीय व्यक्तिमत्व मराठी कथावाङ्मयाचं चिरस्थायी भूषण ठरेल यात शंका नाही. ■

## : ३ :

## मुक्ता : जयवन्त दळवींचे नवे नाटक

**परीक्षण : वि. भा. देशपांडे**

[ मॅजेस्टिक बुकस्टॉल, पुणे. मूल्य रु. २०. ]

' मुक्ता 'हे जयवंत दळवी यांच्या अलीकडील महत्त्वाच्या नाटकांपैकी एक. हे नाटक घडते कोकणातल्या एका लहानशा खेड्यात. नाट्यगत काळ आहे १९३६–३७ सालचा. म्हणजे सुमारे पन्नास वर्षांपूर्वीचा.

या नाटकातील घटिते प्राधान्याने कामत मास्तरांच्या घरातीलच आहेत. काही भाग शाळा, गाव यांच्या परिसरातला आहे. श्रीकांत कामत यांचे घर, त्यातील माणसांच्या जीवनात घडणाऱ्या घटनांवर कथानकाचा पसारा प्राधान्याने उभारलेला आहे. श्रीकांत कामत आणि त्याच्या दोन्ही बहिणी अविवाहित आहेत. बेबी ही मोठी आणि केशर लहान बहीण. श्रीकांतच्या आईने विहिरीत उडी टाकून जीव दिलेला, तर वडील घरदार

सोडून देशोधडीला लागलेले! आईवापाविना पोरक्या झालेल्या या घराबद्दल गावात काही समज आहेत. विशेषतः आईचे जीव देणे याच्याशी वेडाचा संबंध जोडलेला. परिणामी या घराशी विवाहसंबंध करण्यास कोणी राजी नाही. सगुणचे आणि बेबींचं प्रेम आहे, पण तो घरच्या विरोधामुळे तिच्याशी लग्नाला तयार नाही. केशरला कादंबरी वाचनाचे विलक्षण वेड आहे. विशेषतः बंगाली वातावरणातल्या कादंबरी वातावरणात ती स्वतःला हरवून बसली आहे. 'देवदास' कादंबरीतील पार्वती आणि देवदास यांच्या प्रीतीकथेची स्वतःच्या आयुष्याशी ती साम्य जोडू पाहते आहे. त्याच स्वप्नाळू वातावरणात वावरत असताना जगदीश देसाईला देवदासाच्या रूपात अनुभवते आहे.

पण हे नाटक केवळ कामत वहिणी-भावाच्या प्रेमभंगात, प्रेमविरहात फिरत नाही. कथानकाचा आणखी एक केन्द्रबिंदू सतत वदलत राहणारा आणि पुढे तिथेच स्थिरावणारा आहे तो म्हणजे 'मुक्ता'च्या करूण जीवनांगाचा. मुक्ता या व्यक्तिरेखेची जयवन्त दळवींनी केलेली निर्मिती ही नाटकाची कलात्मक पातळी उंचावणारी आहे. श्रीकांत, जगदीश, घाटे, दाभोळकर, साटम आदी सारी मंडळी मुक्ताकडे पुरुषाच्या नजरेने पाहात आहेत. पण प्रत्येकाच्या नजरेत, उद्‌गारात आणि अर्थात कृतीतही भिन्न भिन्न स्तर आहेत. ती दर्शनी वेडी आहे. दिसायला सुंदर आहे. वेडाच्या भरात सारा दिवस ती गावात भिरभिरते आहे. अशातच तिला दिवस गेलेत. ती कोणापासून गरोदर राहिली हा साऱ्यांनाच कुतूहलाचा विषय झालेली आहे. जगदीश देसाई तिला चाफ्याची फुले देत असतो, तर तिला गरोदर अवस्थेत कैरी खावीशी वाटते हे कळल्यावर कैरीचा मोसम नसतानाही घाटे मास्तर दुसऱ्या गावाहून तिला कैऱ्या आणून देतात. श्रीकांत साडी आणून देतो. मुक्ता वेडी असली तरी तिला आपल्या शरीरातला बदल कळतो आहे. या अवस्थेतल्या आवडी तिला सांगता येताहेत. सातव्या महिन्यात आपल्याला फुलांची वाडीभरावी अशीही तिची इच्छा ती व्यक्त करते. अशा मुक्ताचे दिवस भरतात आणि तिला मुलगा होतो. इथे नाटकाचा अर्थपूर्ण शेवट होतो.

अर्थपूर्ण अशा कारणासाठी की, मुक्ताचे सौंदर्य, वेडेपण, गरोदरपण आणि बाळंत होणे ह्या साऱ्या घटना दळवींनी अन्य व्यक्तिरेखांचे जीवन-तपशील भरण्यासाठी वापरलेल्या आहेत. मुक्ता हे निमित्त आहे. पण तिच्या अस्तित्वामुळे श्रीकांत, जगदीश, घाटे, साटम, दाभोळकर आदी विविध वयाच्या, वृत्तीच्या पुरुषांच्या मनाचा तळ उलगडून दाखवण्याचा, त्यात खोलवर पाहण्याचा दळवींचा प्रयत्न आहे. तो या नाटकाचा कणखर सत्त्वयुक्त असा भाग आहे. त्याचबरोबर संपूर्ण नाटकभर मुक्ताच्या अस्तित्वाची चर्चा खेळती ठेवून तिचे दर्शन मात्र आवश्यक तेवढेच घडवलेले आहे.

माणसांमधली वेडाची भावना आणि विषयवासना यांचा वापर दळवींच्या अनेक नाटकात प्राधान्याने आलेला आहे तसा तो येथेही आहे. परंतु मुक्ताच्या वेडाचं दर्शनी किंवा कृतीयुक्त चाळे दाखवून वाचकाची, प्रेक्षकाची सहानुभूती मिळवण्याचा मार्ग त्यांनी स्वीकारलेला नाही. या उलट माणसांची मने शरीरदर्शनाने, भोगकल्पनेने, प्रेमभावनेने कशी दयनीय होतात, किती करुणामय होतात याचा घेतलेला शोध नाटकाची वाङ्मयीन गुणवत्ता वाढवणारा आहे.

आणखी एक ध्यानात येते की, यातली प्रत्येक व्यक्तिरेखा आयुष्यात निरनिराळ्या स्तरावर अपेशी आहे, दुःखी आहे. आवडीचा जोडीदार न मिळणे किंवा विवाहसुख न मिळणे, पुत्रमुख न मिळणे अशा भिन्नस्तरीय दर्शनाचा भाग दळवी नाट्यपूर्ण रीतीने व्यक्त करतात. त्यासाठी 'ऑथेल्लो' नाटकातील प्रसंग, देवदास कादंबरीतील देवदासने पारूला नाकारणे आणि अखेर तिच्याच दाराशी मरून पडणे, गोकुळ अष्टमी इत्यादींचा वापर सूचकतेने केलेला आहे.

घटनांपेक्षा व्यक्तींच्या मनाचा शोध घेऊन नाट्यताण किंवा भावताण निर्माण करणारे हे नाटक आपल्याला अस्वस्थ करते.

फक्त एकाच गोष्टीचे कुतूहल मनात राहते ते म्हणजे दळवींनी विशिष्ट काळात हे नाटक का घडवले असेल? १९३६-३७ या विशिष्ट कालखंडाचा आणि नाट्यविषयाचा अनुबंध नेमका आहे असे वाटत नाही. नाटकातील घटना कालबद्ध नाहीत तर माणसाच्या सनातन वृत्तीचे दर्शन घडवणाऱ्या आहेत.

■



अनुक्रमणिका

# परिषद-वार्ता

(१ नोव्हेंबर ८५ ते २८ फेब्रुवारी ८६ अखेर)

## साहित्यिक व सांस्कृतिक कार्यक्रम

### कै. काशिनाथ रघुनाथ मित्र

**शारदीय व्याख्यानमाला** : या वर्षीपासून दरवर्षी होणारी शारदीय व्याख्यानमाला कै. काशिनाथ रघुनाथ मित्र (मासिक मनोरंजनकर्ते) यांच्या स्मरणार्थ होणार आहे. या वर्षी दि. १८-११-८५ ते २७-११-८५ अखेर ही व्याख्यानमाला आयोजित करण्यात आली होती. 'वाङ्मयीन नियतकालिकांचे कार्य' हा या व्याख्यानमालेचा विषय होता. पुढीलप्रमाणे व्याख्याने झाली : विविधज्ञान विस्तार – प्रा. गो. म. कुलकर्णी, काव्यरत्नावली – डॉ. शकुंतला आठवले, करमणूक – डॉ. भालचंद्र फडके, मनोरंजन – प्रा. म. ना. अदवंत, रंगभूमी – डॉ. रा. शं वाळिंबे, रत्नाकर – डॉ. भीमराव कुलकर्णी, यशवंत – डॉ. यशवंत पाठक, प्रतिभा – डॉ. व. दि. कुलकर्णी, सत्यकथा – प्रा. प्र. ना. परांजपे, अभिरुची – डॉ. गं. ना. जोगळेकर. सर्व व्याख्याने माहितीपूर्ण झाल्याने या मालेस श्रोत्यांचा उत्तम प्रतिसाद मिळाला.

**कै. माधव जूलियन स्मृतिदिन** : दि. २९-११-८५ रोजी कै. माधव जूलियन स्मृतिदिनानिमित्त डॉ. द. ता. भोसले यांचे 'आजची दलित कविता' या विषयावर व्याख्यान झाले.

**कै. य. दि. पेंढरकर (कवी यशवंत) दुखवटा सभा** : परिषदेचे अध्यक्ष, कार्याध्यक्ष, पत्रिका संपादक, कार्यवाह इ. विविध नात्यांनी कवी यशवंत परिषदेच्या कार्याशी निगडीत होते. त्यांच्या दुःखद निधनाबद्दल दि. ६-१२-८५ रोजी परिषदेत दुखवट्याची सभा झाली. गोपीनाथ तळवलकर, हे सभेचे अध्यक्ष होते. सर्वश्री सुषमा पेंढरकर, वि. म. कुलकर्णी, किशोर पेंढरकर, संजीवनी मराठे यांची श्रद्धांजली अर्पण करणारी भाषणे झाली. सभेचे शेवटी दुखवट्याचा ठराव संमत करण्यात आला.

**कै. श्री. म. माटे स्मृतिदिन** : दि. २५ व २६ डिसेंबर रोजी कै. श्री. म. माटे स्मृतिदिनानिमित्त श्री नानासाहेब गोरे यांची 'समाजपरिवर्तनाची वाटचाल' या विषयावर दोन व्याख्याने झाली.

**गुजराती साहित्य संमेलन** : पुण्यात भरलेल्या अ. भा. गुजराती साहित्य संमेलनाच्या अधिवेशनप्रसंगी परिषदेचे कार्याध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी, कार्यवाह श्री. राजा फडणीस व डॉ. म. वि. गोखले हे उपस्थित होते. परिषदेतर्फे संमेलनाध्यक्ष श्री. के. का. शास्त्री यांना हार समर्पण करण्यात आला. या संमेलनानिमित्त दि. २१ डिसेंबर रोजी प्रा. डॉ. जया मेहता यांचे 'गुजराती साहित्यातील नवे प्रवाह' या विषयावर व्याख्यान झाले.

**गुजराती साहित्यिक भेट** : दि. २८ डिसेंबर रोजी अखिल भारतीय गुजराती साहित्य संमेलनानिमित्त पुण्यात आलेल्या निवडक गुजराती साहित्यिकांना परिषदेत भेटीसाठी बोलाविले होते. याप्रसंगी परिषदेचे कार्याध्यक्ष राजेन्द्र बनहट्टी यांनी स्वागत व प्रास्ताविक केले. परिषदेचे अध्यक्ष श्री. शंकर पाटील यांनी गुजराती साहित्य संमेलनाध्यक्ष श्री. के. का. शास्त्री यांचा पुष्पगुच्छ देऊन सत्कार केला. श्री. रघुवीर चौधरी यांनी गुजराती साहित्यिकांचा व डॉ. म. वि. गोखले यांनी मराठी साहित्यिकांचा परिचय करून दिला. प्रा. वसंत बापट यांनी गुजराती व मराठी भाषा यांचा ऋणानुबंध अतूट असल्याचे सांगितले. शेवटी सौ. संजीवनी मराठे यांनी आपली एक कविता गाऊन दाखविली.

यावेळी सर्वश्री उमाशंकर जोशी, यशवंत शुक्ल, बकुल त्रिपाठी, गुलाबदास ब्रोकर इ. गुजराती साहित्यिक, परिषदेच्या कार्यकारी मंडळाचे स्थानिक सदस्य आणि शंकरराव खरात, अनुराधा पोतदार, आनंद यादव, संजीवनी मराठे, स. शि. भावे, भीमराव कुलकर्णी इ. मराठी साहित्यिक उपस्थित होते.

**कै. वि. द. घाटे स्मृतिदिन :**

दि. १८ जानेवारी रोजी कै. वि. द. घाटे यांचा स्मृतिदिन साजरा करण्यात आला. याप्रसंगी प्रा. कृ. व. निकुम्ब ( बेळगाव ) यांचे 'साहित्य आणि वाचकांच्या अपेक्षा' या विषयावर व्याख्यान झाले.

**परिषदेची कॉंटिनेंटल प्रकाशन पुरस्कृत पारितोषिके :**

कॉंटिनेंटल प्रकाशन पुरस्कृत कै. चिं. वि. जोशी पारितोषिक वितरणाचा पहिला समारंभ दि. १९ जानेवारी रोजी परिषदेतर्फे शिक्षणशास्त्र संस्थेच्या सभागृहात साजरा करण्यात आला. सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. पु. ल. देशपांडे यांच्या हस्ते श्री. विजय कापडी यांच्या 'यंव आणि त्यंव' या विनोदी पुस्तकास प्रस्तुतचे रु. १२००/– पारितोषिक देण्यात आले. तसेच प्रकाशिका सौ. सुनीता मिरासदार ( सुपर्ण प्रकाशन ) यांनाही रु. ९००/– चे पारितोषिक देण्यात आले. आरंभी परिषदेचे कार्याध्यक्ष श्री. राजेन्द्र बनहट्टी यांनी प्रास्ताविक केले. नंतर प्रा. द. मा. मिरासदार, प्राचार्य बाळ गाडगीळ यांनी परीक्षक म्हणून आपले विचार मांडले. अध्यक्ष श्री. पु. ल. देशपांडे यांनी अध्यक्षीय भाषण केले.

कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत कवी कुसुमाग्रज पारितोषिक वितरणाचा कार्यक्रम २७ फेब्रुवारीला कवि वसंत बापट यांच्या अध्यक्षतेखाली झाला. '...तरीही' या कवितासंग्रहाच्या कवयित्री सौ. अनुराधा पाटील आणि संग्रहाचे प्रकाशक श्री. कौ. तो. पाटील यांना अनुक्रमे रु. १२०० व रु. ९०० ची पारितोषिके देण्यात आली. परिषदेचे अध्यक्ष श्री. शंकरराव पाटील यांनी प्रास्ताविक भाषण केले. परीक्षक या नात्याने डॉ. अनुराधा पोतदार यांनी आपले विचार व्यक्त केले.

सौ. अनुराधा पाटील यांनी आपल्या काही निवडक कविता वाचून दाखवल्यानंतर प्रा. वसंत बापट यांनी समयोचित असा समारोप केला.

**पं. महादेवशास्त्री जोशी सत्कार व व्याख्यान :**

पं. महादेवशास्त्री जोशी यांनी ८१ व्या वर्षात पदार्पण केले त्याबद्दल व त्यांच्या साहित्यिक कामगिरी-बद्दल परिषदेतर्फे दि. ३ फेब्रुवारी रोजी त्यांचा सत्कार करण्यात आला. या प्रसंगी श्री. शंकर पाटील हे अध्यक्षस्थानी होते. श्री. शास्त्रीबोवांचा शाल, गुच्छ, श्रीफल देऊन अध्यक्षांचे हस्ते सत्कार करण्यात आला. तसेच सौ. सुधाताई जोशी यांनाही या प्रसंगी पुष्पगुच्छ देण्यात आला. सत्कारानंतर पं. जोशी यांचे 'माझी वैदिक प्रेरणा' या विषयावर व्याख्यान झाले.

**अभीष्टचिंतन :**

श्री. विश्राम बेडेकर यांच्या 'एक झाड आणि दोन पक्षी' या पुस्तकास 'साहित्य अकादमी'चे पारितोषिक प्राप्त झाले. त्या निमित्ताने परिषदेतर्फे कोषाध्यक्ष श्री. म. श्री. दीक्षित यांनी त्यांच्या घरी जाऊन पुष्प-गुच्छ देऊन अभीष्टचिंतन केले.

'माणूस' साप्ताहिकाच्या रौप्य महोत्सवानिमित्त संपादक श्री. श्री. ग. माजगावकर यांचा परिषदेतर्फे पुष्पगुच्छ देऊन सत्कार करण्यात आला.

परिषदेचे माजी कार्यवाह व साहित्यिक श्री. वि. ग. कानिटकर यांच्या वयास २६ जानेवारी रोजी ६० वर्षे पूर्ण झाल्याबद्दल कार्याध्यक्ष, कार्यवाह व कोषाध्यक्ष यांनी त्यांच्या घरी जाऊन पुष्पगुच्छ देऊन त्यांचे अभीष्ट-चिंतन केले.

सुप्रसिद्ध कवयित्री सौ. संजीवनी मराठे यांनी ७१ व्या वर्षात पदार्पण केले, त्याबद्दल दि. १६ फेब्रुवारीला झालेल्या गौरव समारंभात सौ. संजीवनी मराठे यांना परिषदेतर्फे पुष्पहार अर्पण करण्यात आला. सौ. संजीवनीबाईंनी वाढदिवसानिमित्त परिषदेला रु. १०१/–ची देणगी दिली.

'साहित्यप्रेमी भगिनी मंडळ' या पुण्यातील साहित्यप्रेमी महिलांच्या संस्थेला २० वर्षे पूर्ण झाली त्याबद्दल संस्थेने दि. २५ डिसेंबर रोजी आयोजित केलेल्या साहित्यिक मेळाव्यास परिषदेचे पदाधिकारी श्री. राजा फडणीस व श्री. म. श्री. दीक्षित उपस्थित राहिले होते. संस्थेने चालविलेल्या साहित्यविषयक कार्याला मदत म्हणून परिषदेतर्फे रु. २५०।– याप्रसंगी देणगी म्हणून देण्यात आले.

**दिवाळी अंक पारितोषिके :**

१९८५मधील पुढील दिवाळी अंक उत्कृष्ट ठरविण्यात आले व त्यांना 'विविधज्ञानविस्तार' कर्ते मोरमकर, 'मासिक मनोरंजन' कर्ते का. र. मित्र आणि किर्लोस्कर 'चे शं. वा. किर्लोस्कर यांचे नावे प्रत्येकी रु. १०१ ची पारितोषिके देण्यात आली : **दीपावली** (संपादक : अशोक कोठावळे), **किस्त्रीम** (संपादक : श्री. भा. महावळ, विद्या बाळ), **अक्षर** (संपादक : निखिल वागळे). याशिवाय **'ऐसी अक्षरे'** (संपादक : सतीश तिरोडकर, पद्माकर जोशी) आणि **अभिजात** (संपादक : स्मिता पटवर्धन) हे दोन अंक उत्तम म्हणून प्रकट करण्यात आले. दिवाळी अंकातील उत्कृष्ट ललितलेखास कै. अनंत काणेकर यांचे स्मरणार्थ दिले जाणारे रु. २००/–चे पारितोषिक मेनका दिवाळी अंकातील डॉ. आनंद यादव यांच्या 'मनातली गौळण' या लेखास देण्यात आले.

सौ. ज्योत्स्ना देवधर, श्री. राजा फडणीस व डॉ. म. वि. गोखले यांच्या समितीने परीक्षक म्हणून काम पाहिले.

**परीक्षा :**

१९८५ मधील मराठी परीक्षा दिनांक ४ व ५ जानेवारी रोजी सुव्यवस्थित पार पडल्या. यावर्षी विविध १५ केन्द्रातून परीक्षा झाल्या. प्रथमा ४७५, प्रवेश ३०४, प्राज्ञ ६६, विशारद ३१ याप्रमाणे उमेदवार परीक्षेस बसले होते.

**देणग्या :**

कै. द. वा. पोतदार स्मृत्यर्थ निर्माण केलेल्या निधीत पुढील देणग्यांची भर पडली आहे. डॉ. सरोजिनी बाबर, रु. १०१/–, डॉ. भीमराव कुलकर्णी रु. २५/–, प्रा. मु. मा. जगताप रु. १०१/–, श्री. वसंतराव देव रु. १०१/–, प्रा. ग. न. साठे रु. १००/–, प्रस्तुत निधीची रक्कम एकूण रु. २५६३/– झाली आहे. वरील देणगीदारांची परिषद आभारी आहे.

संत शिरोमणी श्री. सावता महाराज व्याख्यानमाला : या मालेत दर वर्षी दोन व्याख्याने करण्यासाठी श्री. मा. गो. डोमाळी यांनी अतिशय परिश्रमपूर्वक पुढील व्यक्तींकडून देणग्या जमवून एकूण रु. ५,०१५/– या निधीची पूर्तता केली. या निधीसाठी पुढील व्यक्तींनी देणग्या देऊन सहकार्य केले. दि. सासवड माळी शुगर फॅक्टरी, माळीनगर रु. १००१/–, श्री. विजयराव ना. बोरावके रु. ५०१/–, श्री. शंकरराव ग. बोराटे रु. ५०१/–, श्री. उदयराव ना. बोरावके रु. ५०१/–, श्री दिलीपराव कृ. राऊत रु. ५०१/–, श्री. राजेन्द्रराव ना. बोरावके रु. ५०१/–, डॉ. सौ. सुलोचना शां. पाटील रु. २५१/–, श्री. जयराज द. ससाणे रु. २५१/–, श्री. सतिशराव श. पिंगळे रु. २५१/–, श्री. रामचंद्र ल. डोके रु. २५१/–, श्री. चंद्रकांत कि. कुदळे रु. १५१/–, श्री. ना. पां. क्षीरसागर रु. १०१/–, श्री. अशोकराव शि. नायकवडी रु. १०१/–, श्री. चंद्रशेखर गं. पाषाणकर रु. १०१/–, श्री. मारुतराव गो. डोमाळे रु. ५१/–

**ग. रा. वाळ कथा–पारितोषिक :**

पुण्यातील एक ज्येष्ठ ऑडीटर श्री. ग. रा. बाळ यांनी स्थापिलेल्या ट्रस्टतर्फे दरवर्षी उत्कृष्ट कथेला रु. १००० चे पारितोषिक दिले जाते. यंदापासून श्री. बाळ यांनी हे कार्य परिषदेकडे सोपविले आहे. त्याप्रमाणे १९८५ मधील 'धर्मयोद्धा' (लक्ष्मण लोंढे–दीपावली दिवाळी अंक) या कथेस बाळ–पारितोषिक देण्यात आले.

**राजा फडणीस / म. वि. गोखले / प्रभाकर अत्रे**

कार्यवाह

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे १९८५ चे पहिले कॉंटिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत चिं. वि. जोशी पारितोषिक ' यंव आणि त्यंव ' या विनोदी पुस्तकाला देण्यात आले. पारितोषिक वितरण समारंभ पु. ल. देशपांडे यांच्या अध्यक्षतेखाली दि. १९ जानेवारी १९८६ रोजी झाला.



पुस्तकाचे लेखक श्री. विजय कापडी अध्यक्ष श्री. पु. ल. देशपांडे यांच्या हस्ते पारितोषिक स्वीकारताना.



पुस्तकाच्या प्रकाशिका सुपर्ण प्रकाशनच्या सौ. सुनीता मिरासदार अध्यक्ष श्री. पु. ल. देशपांडे यांच्या हस्ते पारितोषिक स्वीकारताना.

अनुक्रमणिका